नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
राज्य मराठी विकास संस्था
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका

# मराठीच्या अभिजात दर्जासाठी 'मसाप'चा आवाज दिल्लीत!




मराठी भाषेला अभिजात भाषेचा दर्जा मिळावा यासाठी केंद्र सरकारचे लक्ष वेधण्यासाठी महाराष्ट्र साहित्य परिषदेने दिल्लीत धरणे आंदोलनाचा इशारा दिला होता, पण दिल्ली पोलिसांनी परवानगी नाकारल्यामुळे साहित्य परिषदेच्या कार्यकर्त्यांनी मराठी भाषेला अभिजातचा दर्जा देण्याची सदसद्विवेकबुद्धी केंद्र सरकारला मिळावी यासाठी २६ जानेवारीला दिल्लीच्या महाराष्ट्र सदनात शिवछत्रपतींच्या पुतळ्यासमोर प्रार्थना केली आणि 'जय भवानी, जय शिवाजी'च्या घोषणांनी परिसर दुमदुमून गेला. स्वातंत्र्यानंतरच्या सत्तर वर्षांच्या कालखंडात महाराष्ट्राच्या साहित्य संस्थेने भाषिक प्रश्नासाठी दिल्लीत आवाज उठवण्याची ही घटनाच ऐतिहासिक होती. महाराष्ट्र साहित्य परिषदेचे कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी, साताऱ्याचे आमदार शिवेंद्रसिंहराजे भोसले, मसाप सातारा जिल्हा प्रतिनिधी विनोद कुलकर्णी, रवींद्र बेडकिहाळ, पुणे जिल्हा प्रतिनिधी राजन लाखे, लेखक राजेंद्र माने, डॉ. उमेश करंबळेकर यांच्यासह अनेक मराठीप्रेमी या वेळी उपस्थित होते.

प्रा. जोशी म्हणाले, 'मराठीला अभिजात भाषेचा दर्जा मिळावा यासाठीच्या सर्व तांत्रिक आणि कायदेशीर बाबींची पूर्तता झालेली असतानाही देशातील सहा भाषांना अभिजातचा दर्जा देणारे केंद्र सरकार मराठीला हा दर्जा देण्यासाठी मात्र चालढकल करत आहे. हा विषय मार्गी लागावा यासाठी साहित्य परिषदेने लोकचळवळ सुरू केली. पंतप्रधान कार्यालयाला एक लाखांहून अधिक पत्र पाठवली. सातत्याने पत्रव्यवहार केला. केंद्रीय मंत्री नितीन गडकरी, मुख्यमंत्री देवेंद्र फडणवीस, सांस्कृतिक मंत्री विनोद तावडे, माजी मुख्यमंत्री पृथ्वीराज चव्हाण यांच्यासह अनेकांशी संपर्क साधला. राजकीय इच्छाशक्ती कमी पडल्यामुळे हे काम होऊ शकले नाही. अभिजात दर्जासाठी आता केवळ केंद्रीय मंत्रीमंडळाच्या मंजुरीची आवश्यकता आहे. मराठीला 'अभिजात'चा दर्जा मिळणे हा मराठी अस्मितेचा विषय आहे. २७ फेब्रुवारीपूर्वी (मराठी भाषा दिनापूर्वी) अभिजातचा निर्णय जाहीर न केल्यास आंदोलन तीव्र करण्यात येईल. शिवेंद्रसिंहराजे म्हणाले, सर्व राजकीय पक्षांनी राजकीय मतभेद बाजूला ठेवून या विषयासाठी एकत्र येणे जरुरीचे आहे.

साहित्य परिषदेचे कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी आणि आमदार शिवेंद्रसिंहराजे भोसले यांनी दिल्लीत केंद्रीय मनुष्यबळ विकास मंत्री प्रकाश जावडेकर यांची त्यांच्या निवासस्थानी भेट घेऊन त्यांना अभिजातचा विषय मार्गी लावण्यासाठी पुढाकार घेण्याचे आवाहन केले. त्याला जावडेकरांनी सकारात्मक प्रतिसाद दिला.

---




**महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या 'मसाप गप्पा' कार्यक्रमात माजी केंद्रीय गृहसचिव माधव गोडबोले यांची निवेदक सुधीर गाडगीळ यांनी घेतलेली मुलाखत रंगली. या कार्यक्रमाला रसिकांनी गर्दी केली होती.**



महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक क्र. ३६२, जानेवारी-मार्च २०१८

संपादक

**डॉ. पुरुषोत्तम काळे**

संपादन समिती

**डॉ. मनोहर जाधव । डॉ. नीलिमा गुंडी । डॉ. भास्कर ढोके**
**डॉ. रणधीर शिंदे । डॉ. वर्षा तोडमल । डॉ. संदीप सांगळे**

प्रकाशक

**प्रकाशक पायगुडे**

प्रमुख कार्यवाह

येणें वाग्यज्ञे तोषावे
महाराष्ट्र साहित्य परिषद

**महाराष्ट्र साहित्य परिषद**

टिळक रस्ता, पुणे ४११०३०. दूरभाष : ०२०-२४४७५९६३
संकेतस्थळ : www.masapapune.org
ई-मेल : masaparishad@gmail.com
(कार्यालयाची वेळ : स. ९.३० ते १२, दु. ४.३० ते रा. ८)

महाराष्ट्र साहित्य परिषद

मुद्रक-प्रकाशक
**प्रकाश पायगुडे**
प्रमुख कार्यवाह
महाराष्ट्र साहित्य परिषद,
टिळक रस्ता, पुणे ४११०३०.

जाहिरात व्यवस्थापक
**वि. दा. पिंगळे**
७७३८३१६२६२

संपादकीय संयोजन
**संदीप खाडे**

अक्षरजुळणी व सजावट
**आर्ट ॲडव्हर्टायझिंग**

मुखपृष्ठ
**जयदीप कडू**

मुद्रितशोधन
**अनुश्री भागवत**

मुद्रणस्थळ
**एस.ए. प्रिंटर्स, एल.एल.पी.**
फ्लॅट नं.५, ३रा मजला,
सिद्धीविनायक अपा.,
शिवदर्शन, पुणे ४११००९.

मूल्य : १५ रुपये

प्रकाशन क्र. ३६२
जानेवारी-मार्च २०१८



# अंतरंग

संपादकीय

डॉ. पुरुषोत्तम काळे

# संमेलनाध्यक्षांचे विचारप्रवर्तक भाषण

मराठी नववर्ष शुभेच्छा!

महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या ३६२व्या अंकाचे प्रकाशन होत असताना मराठी नववर्ष सुरू होत आहे. आपणा सर्वांना नववर्षाच्या हार्दिक शुभेच्छा! आगामी वर्षभरामध्ये मराठी भाषा साहित्यव्यवहार वृद्धिंगत होवो, मराठी भाषेला 'अभिजात' दर्जा मिळण्यामधील सर्व अडथळे दूर होवोत आणि मराठी शाळा बंद न होवोत, अशी मनोकामना व्यक्त करतो.

नुकतेच अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन बडोदा येथे पार पडले. अ. भा. मराठी साहित्य संमेलनात संमेलनाध्यक्ष एकूणच मराठी भाषा, साहित्य आणि साहित्यव्यवहार याविषयीचे चिंतन आपल्या भाषणातून मांडतात. साहित्य संमेलनाध्यक्ष लक्ष्मीकांत देशमुख यांचे अध्यक्षीय भाषण हे प्रगल्भ आणि मूलगामी चिंतनाचे द्योतक आहे. बडोदा नगरी आणि महाराज सयाजीराव गायकवाड यांचे अतूट नाते आहे. महाराजा सयाजीरावांनी मराठी आणि गुजराथी भाषेसाठी जे अतुलनीय कार्य केले, त्याचा उचित आढावा मा. लक्ष्मीकांत देशमुखांनी घेतला. आपल्या लेखनामागची भूमिका स्पष्ट करतानाच संमेलनाध्यक्षांनी साहित्याचे तत्त्वज्ञानही मांडले. भारतीय साहित्यातील कलावादी 'रामायण' परंपरा आणि जीवनवाद 'महाभारत' परंपरा यांचा उल्लेख करून भारतीय साहित्य हा या दोन्ही परंपरांचा संयोग आहे, हा नावीन्यपूर्ण विचार त्यांनी मांडला. वंचित आणि शोषितांचा स्वर मुखर करण्याचे काम साहित्याने केले पाहिजे, हे सांगतानाच मराठी भाषा आणि साहित्यव्यवहारांबाबतच्या शासकीय धोरणाची वस्तुस्थिती त्यांनी



अनुक्रमणिका

मांडली. मराठी भाषेसाठी 'अभिजात भाषा' दर्जा, मराठी भाषा विद्यापीठ आणि मराठीच्या विकासासाठी आखावयाच्या योजनांचा आराखडा देशमुखांनी मांडला. 'राजा, तू चुकतो आहेस' हे सांगत असतानाच दाभोळकर, पानसरे, कलबुर्गी आणि गौरी लंकेश या विचारवंतांच्या हत्या तपासात प्रगती होत नसल्याबाबत खंतही व्यक्त केली. एकूणच संमेलनाध्यक्ष लक्ष्मीकांत देशमुख यांचे भाषण विचारप्रवर्तक होते.

गेल्या काही काळात सोलापूरचे ख्यातकीर्त कवी लक्ष्मीनारायण बोल्ली, वाईच्या विश्वकोश मंडळातील आपल्या योगदानामुळे ख्यातनाम असलेले अनिल कुलकर्णी, साहित्य संमेलनासह सर्व वाङ्मयीन उपक्रमांना नेहमी मदत करणारे भारतीय विद्यापीठाचे संस्थापक, माजी मंत्री पतंगराव कदम आणि महान संशोधक स्टिफन हॉकिंग्ज यांचे निधन झाले. या सर्व दिवंगत मान्यवरांना म.सा. पत्रिकेच्या वतीने मनःपूर्वक आदरांजली!

म. सा. पत्रिकेच्या या अंकात नेहमीप्रमाणेच वैविध्यपूर्ण विषयांवरील लेख रसिक वाचकांना वाचण्यास मिळतील. 'विंदा' करंदीकरांच्या जन्मशताब्दीपूर्तीनिमित्त नीलिमा गुंडी यांनी विंदांच्या कवितेचा आणि कर्तृत्वाचा यथोचित आढावा घेतला आहे. पी. विठ्ठल आणि अरुण इंगवले हे समकालातील महत्त्वाचे कवी आहेत. पी. विठ्ठल यांच्या 'एक शून्य मी' या काव्यसंग्रहातील कवितेची सौंदर्यस्थळे भास्कर ढोके यांनी उलगडून दाखवली आहेत. मराठी साहित्यात आजवर उमटलेल्या पर्यावरणाचा व्यासंगी आढावा संतोष शिंत्रे यांनी घेतला आहे. हा आणि सुहास पुजारी यांच्या 'मराठी कादंबरी सृष्टी आणि दृष्टी' या ग्रंथावरील लेख जिज्ञासू संशोधकांना मार्गदर्शक ठरेल. भोसे (जि. सोलापूर) येथे झालेल्या बालकुमार साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदावरून केलेले भाषण अशा संमेलनांची प्रस्तुतता आणि या संमेलनाचे फलित याबाबत मूलगामी विचार मांडणारे आहे. डॉ. छाया महाजन यांचा अनुवादावरील, कैलास सलादे यांचा मराठी ग्रामीण कवितेतील 'दोन अस्वस्थ दशके' हा लेख आणि विद्या सुर्वे-बोरसे यांचा 'मराठी कवितेतील समाजबदलांचे प्रतिबिंब' हा लेख वैशिष्ट्यपूर्ण आणि नवीन दृष्टी देणारे आहेत. औदुंबराच्या साहित्य संमेलनाच्या पंचाहत्तरीनिमित्त प्रा. वैजनाथ महाजन यांचा लेख औदुंबर येथील साहित्य चळवळींचा लेखाजोखा घेतो.

साहित्य अकादमीचे पुरस्कार मा. श्रीकांत साहेबराव देशमुख आणि सुजाता देशमुख यांना जाहीर झाले. या दोन्ही मान्यवरांचे हार्दिक अभिनंदन!

या अंकाचे स्वागत नेहमीप्रमाणेच जाणकार, रसिक करतील ही अपेक्षा व्यक्त करतो आणि थांबतो.

◆

**डॉ. पुरुषोत्तम काळे**
चलभाष : ९४०४९३७७१०
purushottamdkale@gmail.com

(टीप : हा अंक मसापच्या www.masapapune.org या संकेतस्थळावर तसेच डेलीहंट या मोबाइल ॲपवरही उपलब्ध आहे.)

लेख

डॉ. नीलिमा गुंडी

# विंदा देणाऱ्या हातांचे ऋण

विंदा जेव्हा सामाजिक जाणिवेच्या कविता लिहितात, तेव्हा बऱ्याचदा त्यातील वक्तृत्वाचा पोत, समाजमनाशी संवाद साधण्याची हातोटी आणि भाषेच्या अंत:सामर्थ्याचा कलात्मक वापर करून योजलेले अलंकरण यांचा वाचकांवर प्रभाव पडतो. त्यांच्या अनेक कवितांमधून त्यांच्या शोषणमुक्त समाजाचे स्वप्न बघणारे कविमन कधी थेटपणे, कधी उपरोधाने तर कधी प्रतीकात्मतेने व्यक्त झाले आहे. मात्र, पूर्वनिश्चित अशा तत्त्वप्रणालीवर कवी म्हणून कायमचा विश्वास टाकण्याचा स्वभाव नसल्यामुळे त्यांची कविता इतरही जीवनानुभवांकडे तितक्याच ताकदीने वळू शकली.



*"देणाऱ्याने देत जावे*
*घेणाऱ्याने घेत जावे*
*घेता घेता एक दिवस*
*देणाऱ्याचे हात घ्यावे''*

असा जीवनमंत्र देणाऱ्या कविवर्य विंदा यांचे हे जन्मशताब्दी वर्ष आहे. विंदा ऊर्फ गो. वि. करंदीकर यांचा जन्म २३ ऑगस्ट १९१८ला धालवल (ता. देवगड, जि. सिंधुदुर्ग) येथे झाला. त्यांचे शालेय आणि महाविद्यालयीन शिक्षण कोल्हापूर येथे झाले. कोल्हापूरच्या राजाराम कॉलेजातील प्राध्यापक माधवराव पटवर्धन ऊर्फ कवी माधव ज्युलियन यांच्या व्यक्तिमत्त्वाचा प्रभाव विंदांवर पडला होता. माधवरावांमध्ये जसा विद्वत्व आणि कवित्व यांचा मिलाफ आहे, तसा मिलाफ आपल्यातही व्हावा, अशी ओढ त्यांना तरुण वयात प्रकर्षाने वाटत राहिली. विंदांच्या व्यक्तिमत्त्वात प्रज्ञा आणि प्रतिभेचा संयोग प्रत्ययाला येतो. तेव्हा हा संदर्भ मनात आठवून जातो. त्यांच्यावर नवकवी बा. सी. मर्ढेकरांचाही प्रभाव होता. विंदांनी मुंबईला रुईया आणि एस.आय.इ.एस. कॉलेज येथे इंग्रजीचे प्राध्यापक म्हणून अध्यापन केले. लौकिक व्यवहारात व गद्यलेखनात गो. वि. करंदीकर म्हणून वावरणारे ते काव्यलेखनासाठी 'विंदा' हीच नाममुद्रा स्वीकारत होते.

विंदांचा काव्यप्रवास 'स्वेदगंगा (१९४९) या संग्रहापासून सुरू झाला. 'मृद्‍गंध' (१९५४), 'धृपद' (१९५९), 'जातक' (१९६८), 'विरूपिका' (१९८१) आणि 'अष्टदर्शने' (२००३) हे त्यांचे काव्यसंग्रह. काव्यप्रांतात लोकमान्यता आणि समीक्षक मान्यता मिळाल्यामुळे लक्षणीय ठरले. याशिवाय ललित निबंध, बालकविता, समीक्षा आणि अनुवाद आदी लेखनामुळेही त्यांचे साहित्यक्षेत्रातले भरीव योगदान, विशेष मान्यताप्राप्त ठरले. त्यांना महाराष्ट्र शासनाचे पुरस्कार मिळाले. राष्ट्रीय स्तरावरील काही मानसन्मान मिळाले. विशेष म्हणजे २००६मध्ये त्यांना 'ज्ञानपीठ' हा सर्वोच्च दर्जाचा राष्ट्रीय पुरस्कार मिळाला. ही समस्त मराठी समाजासाठीच अभिमानाची बाब ठरली आहे. विंदांनी भाषणे, इंग्रजी लेख, मुलाखती, समीक्षा व प्रस्तावना या माध्यमांतून स्वत:ची कलादृष्टी आणि जीवनदृष्टी प्रकट केली आहे. त्यांच्या काव्याचा अभ्यास करताना त्यांचे सर्वच लेखन विचारात घ्यावे लागते. विंदांनी वसंत बापट, मंगेश पाडगावकर यांच्याबरोबर काव्यवाचनाचे कार्यक्रमही सातत्याने

केले होते. त्यानिमित्ताने ते महाराष्ट्राच्या गावोगावीही गेले आणि देशपरदेशातही गेले. विविध सामाजिक संस्थांना आपल्या पुरस्कारांची रक्कम देणगी देताना व्यक्त झालेली त्यांची समाजाभिमुख वृत्तीही लक्षात घ्यावी लागते. २०१०मध्ये त्यांनी लौकिक जगाचा निरोप घेतला असला तरी त्यांच्या कलाकृतींद्वारे त्यांची वाङ्मयीन मूर्ती जनमनावर प्रभाव पाडून आहे.

'स्वेदगंगा' या शीर्षकात अभिप्रेत असलेले रूपक विंदांच्या मनावर त्या काळी असणारा मार्क्सवादी विचारांचा प्रभाव प्रकट करणारे आहे. १९४०च्या सुमारास आपल्याकडील समाजमन मार्क्सवादी विचारधारेने भारावलेले होते. विंदा लिहितात,



*''स्वेदाची ही अखंड गंगा*
*देश, धर्म, रक्ताचे सारे,*
*फोडित धरणे नि बंधारे,*
*उफाळलेली नागीण जैशी*
*जो जो तुडवी त्याला दंशी...*
*शेतातील त्या औतामागून*
*गिरण्यांच्या यंत्रांच्या जवळून,*
*खाणीतून वा खड्ड्यामागून*
*बेभान पुढे वाहत धावे*
*बुजवित शिक्के, बुजवित नावे...''*

विशिष्ट सामाजिक-राजकीय विचारसरणी कवितारूप घेते तेव्हा त्यात कलात्मक आवेग घाटातून प्रतीत व्हावा लागतो. विंदा जेव्हा सामाजिक जाणिवेच्या कविता लिहितात, तेव्हा बऱ्याचदा त्यातील वक्तृत्वाचा पोत, समाजमनाशी संवाद साधण्याची हातोटी आणि भाषेच्या अंतःसामर्थ्याचा कलात्मक वापर करून योजलेले अलंकरण यांचा वाचकांवर प्रभाव पडतो. त्यांच्या 'माझ्या मन बन दगड', 'ती जनता अमर आहे', 'असे काही पाहिले आहे', 'दातापासून दाताकडे', 'चिंधी' आदी अनेक कवितांमधून त्यांच्या शोषणमुक्त समाजाचे स्वप्न बघणारे कविमन कधी थेटपणे, कधी उपरोधाने तर कधी प्रतीकात्मतेने व्यक्त झाले आहे. मात्र, पूर्वनिश्चित अशा तत्त्वप्रणालीवर कवी म्हणून कायमचा विश्वास टाकण्याचा स्वभाव नसल्यामुळे त्यांची कविता इतरही जीवनानुभवांकडे तितक्याच ताकदीने वळू शकली.

विंदांच्या दृष्टीने कविता म्हणजे शब्दांची बंदिश. बंदिश हा संगीतातील शब्द ते 'सौंदर्यनिष्ठ घाट' या अर्थी वापरतात. ते स्वतःला 'जाणीवलक्ष्यी' तसेच 'जीवनवेधी' कवी मानत. जीवनवाद आणि कलावाद यांच्या संघर्षाच्या काळात त्यांनी आपली स्वतंत्र अशी ओळख निर्माण केली. त्यांच्या काव्यदृष्टीला खुलेपणाने जगण्याला भिडण्याची निकड वाटत होती. त्यांच्यातील प्रयोगशील कलावंताला विचार, भावना, संवेदना यांची शब्दसमरसतेतून साकारणारी अधिकाधिक एकात्म वीण घडवायची आस होती. त्यांच्यातील विज्ञाननिष्ठ मन 'ये यंत्रा' म्हणत 'यंत्रावतार' हे नवे 'मिथ' घडवत होते; पण त्याच वेळी त्यांचे विश्वरहस्य जाणून घ्यायला तहानलेले मन 'आज प्रार्थना प्राणाएवढी', 'आदिताल', 'अनामिकाचा हात अहोरूप' आदी कवितांमधून व्यक्त होत होते. त्यांचा मूळ पिंड इहवादी जीवनजाणिवेशी एकनिष्ठ होता, पण म्हणून त्यांनी जगण्याच्या इतर पातळ्या अनुभवविश्वातून बाद केल्या नाहीत. त्यांची रसरशीत जीवनदृष्टी आणि सर्वसामान्यांविषयीची आस्था त्यांच्या 'मृद्‌गंध' संग्रहात भरून राहिली आहे. 'रक्तसमाधी'पासूनच त्यांची सुरुवात झाली होती. 'मृद्‌गंध'मध्ये

*''दफन करून भगव्या कफनीचे*
*मी पृथ्वीचा झालो प्रियकर''*

अशी प्रसंगी परंपरेशी फटकून राहणारी 'स्व'ची ओळख ते ठसठशीतपणे करून देतात. 'ईव्ह'ला नमन करताना ते वासनेचा मोकळ्या मनाने स्वीकार करतात. त्याच वेळी 'कावेरी डोंगरे', 'धोंड्या न्हावी', 'सरोज नवानगरवाली', 'बेकी', इतकेच काय संयुक्त महाराष्ट्र लढ्यात बळी गेलेला कोणी एक अशा सर्वसामान्य व्यक्तींना काव्यात 'नायकत्व' देत विंदा आपल्या अनुभवविश्वाची पाळेमुळे भोवतीच्या जगण्यात रुजलेली असल्याचा विश्वास देतात. विंदांना आणखी एक जगण्याचे रूप ओढून नेते, ते म्हणजे विरूप. या वाटेवर त्यांच्याआधी मनमोहन आणि त्यांच्या समकालीन सदानंद रेगे यांच्या पाऊलखुणा दिसतात.



अनुक्रमणिका

दर्शनी विरोध सहज वितळून टाकणारी त्यांची उदार आणि सर्वसमावेशक प्रतिमा आपल्यासमोर एक व्यापक क्षितिज खुले करते. अभिव्यक्तीच्या नव्या वाटा शोधताना स्वच्छंद, अंतर्वेधी मुक्तछंद, जाणिवेचे आरोहअवरोह खेळवणारी मुक्तसुनीते, भाषेतील अंत:संगीत मुखरित करणारी तालचित्रे, सूक्ते, 'ड्रॅमॅटिक मोनोलॉग'च्या जवळ जाणारी नाट्यात्म कविता, 'आततायी' अभंग, गझल, गीते असे घाट ते योजतात. 'प्रत्येक सिद्धांतात सत्त्वांश असतो. तसाच मिथ्यांशही असतो,' असा इशारा ते साहित्यव्यवहारालाच देतात.

अनुभवाची चाकोरीबद्धता ('तेच ते आणि तेच ते!') टाळण्याची आतून ओढ असल्यामुळे हा कवी भयभाव आणि विरूपता या मूलभूत गोष्टींकडे जणू 'पापणी ठेवून जागी' पाहतात. त्यांच्या 'धृपद'मध्ये, तसेच पिशीमावशीविषयीच्या बालकवितांमध्येही त्यांची ही शक्ती लक्षात येते. इतकेच काय 'आततायी अभंग' लिहितानाही ते देवाला म्हणतात :

> *''आकाशाच्या पेलर, लावोनिया ओठी*
> *पाजलीस घुटी, भयाचीच।''*

विश्वरहस्याविषयीचे कुतूहल आणि मनातल्या तसेच बाहेरच्या विशाल पोकळीचे भय या परस्परविरोधी ताणांतून त्यांचा हा जीवनानुभव आकाराला येत जातो.

विंदांनी साहित्यविश्वाला दिलेले योगदान अनेकपदरी आहे. एकीकडे

> *''नव्हती कल्पना चार हजार मैल*
> *ओलांडूनही मी शेवटी*
> *पोहोचेन फक्त माझ्याच देशात,*
> *असेल वहात गंगाच मिसिसिपीतून''*

असे 'हिमयोग'मध्ये उत्कट प्रादेशिक संवेदन जागवणारे विंदा त्याचवेळी

> *''रक्तारक्तातील। कोसळोत भिंती।*
> *मानवाचे अंती। एक गोत्र।।''*

असे विश्वव्यापक स्वप्नही बघू शकतात. दर्शनी विरोध सहज वितळून टाकणारी त्यांची उदार आणि सर्वसमावेशक प्रतिमा आपल्यासमोर एक व्यापक क्षितिज खुले करते. अभिव्यक्तीच्या नव्या वाटा शोधताना स्वच्छंद, अंतर्वेधी मुक्तछंद, जाणिवेचे आरोहअवरोह खेळवणारी मुक्तसुनीते, भाषेतील अंतःसंगीत मुखरित करणारी तालचित्रे, सूक्ते, 'ड्रॅमॅटिक मोनोलॉग'च्या जवळ जाणारी नाट्यात्म कविता, 'आततायी' अभंग, गझल, गीते असे घाट ते योजतात. 'प्रत्येक सिद्धांतात सत्त्वांश असतो. तसाच मिथ्यांशही असतो,' असा इशारा ते साहित्यव्यवहारालाच देतात. 'नकळत कळणे' महत्त्वाचे असते, असे म्हणत काव्याच्या आस्वादाला महत्त्व देतात. प्रतिमेची सेंद्रियता, भावगर्भता, स्वतंत्रता आणि उत्स्फूर्तता कशी महत्त्वाची असते, याचा प्रत्यय अनेक कवितांमधून घडवतात. भाषेशी कलात्मक भांडण मांडणाऱ्या तत्त्वज्ञ कलावंतांचा शोध घेतात. 'अहो ज्ञानेश्वर' अशी साद घालत 'अमृतानुभवाचे अर्वाचीनीकरण' करताना श्रेष्ठ तत्त्वकाव्य म्हणजे 'तत्त्वज्ञान गुणिले काव्य या राशीचा वर्ग' अशी खास गणिती शैलीत व्याख्या करतात. ज्ञानेश्वरांनाही प्रश्न करतात की अप्रिय, भेसूर व अस्वस्थ करणारे वास्तव प्रतिमासृष्टीतून इतके कटाक्षाने का वगळले? परंपरा आत्मसात करताना डोळसपणे व धीटपणे असे प्रश्न विचारण्याचे सामर्थ्यच ते यातून जणू पुढीलांना देतात. भारतीय तत्त्वज्ञानाबरोबरच पाश्चात्त्य तत्त्वज्ञानही ते अभ्यासतात आणि 'अष्टदर्शने'त चार्वाकाबरोबर त्यांनाही ते स्थान देतात. जीवनानुभवाच्या अंगाने काव्याचा विकास अनुभवतानाच ते व्यासंग, प्रयोगशीलता याद्वारे निर्मितिप्रक्रियेतली लवचिकता अनुभवत काव्यातील विकसनशीलता कायम राखतात. प्रत्येक कलावंताला काही मर्यादा असतात. विंदांच्या काव्यालाही वक्तृत्वाचा सोस ही मर्यादा आहे, पण ती लक्षात घेऊनही त्यांचे मोठेपण दशांगुळे उरते. हे त्यांचे श्रेय कृतज्ञतापूर्वक जपण्याजोगे आहे; याची नोंद त्यांच्या जन्मशताब्दी वर्षात घेणे अगत्याचे आहे.

**आधारभूत ग्रंथ :** संहिता : विंदा करंदीकरांची निवडक कविता, संपा. मंगेश पाडगावकर, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे, १९७५.
२. 'बहुपेडी विंदा', विजया राजाध्यक्ष, मौज, मुंबई, २००५.

●

**डॉ. नीलिमा गुंडी,**
अन्नपूर्णा, १२५९,
शुक्रवार पेठ,
पुणे ४११००२.

भाषण

**डॉ. द. ता. भोसले**

**(महाराष्ट्र साहित्य परिषद, पंढरपूर शाखेच्या वतीने पंढरपूरजवळच्या भोसे (क.) येथे झालेल्या ग्रामीण भागातील बालकुमार साहित्य संमेलनावेळी अध्यक्ष डॉ. द. ता. भोसले यांनी केलेले अध्यक्षीय भाषण. संक्षिप्त स्वरूपात.)**

ज्या नगरीत अनेक मजली इमारती खूप असतात, ती नगरी श्रीमंत नाही. ज्या नगरीत सोन्या-चांदीची अनेक दुकाने असतात, ती नगरी श्रीमंत नाही. ज्या नगरीत अत्यंत महाग असलेल्या चार चाकी गाड्यांची संख्या भरपूर असते, तिला श्रीमंत नगरी म्हणता येत नाही. जिथे सुखोपभोगांची तृप्ती करणारी ठिकाणे भरपूर ती नगरी श्रीमंत नाही. तर जिथे सांस्कृतिक श्रीमंती नांदते, ती नगरी खरी श्रीमंत होय. सांस्कृतिक श्रीमंती म्हणजे जिथे संगीत, नाट्य, चित्र आणि शिल्प यांची प्रदर्शने असतात, सोहळे असतात. जिथे सभा-संमेलनांचे उपक्रम होतात, जिथे नानाविध क्रीडास्पर्धांचे आयोजन केले जाते, जिथे व्याख्याने व व्याख्यानमाला आयोजित केल्या जातात आणि सामूहिक जीवनाचा आविष्कार घडतो; तिला सांस्कृतिक श्रीमंती म्हणता येईल. तिथला समाज मनाने निरोगी बनलेला असतो.

प्रथम सांगितलेल्या ज्या चार-पाच श्रीमंती आहेत; या आर्थिक सुबत्तेच्या निदर्शक अशा म्हणता येतील, पण त्यातून मनाची श्रीमंती, समाजाची शाश्वत उन्नती आणि जीवनाची शाश्वत परिपूर्ती साध्य होत नाही. साध्य होत नसते. कारण १) आर्थिक श्रीमंती ही रोजच्या जीवनाला सुख समाधान देते; तर सांस्कृतिक श्रीमंती आपल्या जीवनाला सुसंस्कृत करते. २) आर्थिक श्रीमंती ही शरीराचे लाड करते; तर सांस्कृतिक श्रीमंती मनाचे भरण-पोषण करते. ३) आर्थिक श्रीमंती वासना-विकारांना खतपाणी घालते; तर सांस्कृतिक श्रीमंती आपल्या वासना-विकारांचे उन्नयन करते. ४) आर्थिक श्रीमंती शोषणावर उभी असते; तर सांस्कृतिक श्रीमंती आनंद, आस्वाद आणि नवनिर्मितीवर उभी असते. ५) आर्थिक श्रीमंती माणसा-माणसामध्ये विषमतेची भिंत निर्माण करते, तर सांस्कृतिक श्रीमंती माणसाला माणसाशी जोडत जाते. ६) आणि शेवटी शेवटी असे म्हणेन की, आर्थिक श्रीमंती माणसाला सतत अतृप्त स्थितीत ठेवते; पण सांस्कृतिक श्रीमंती आपणाला निखळ आनंदाची तृप्ती देत असते. आणि ती दीर्घकाळ टिकणारी असते. आणि ही श्रीमंती जीवनाला पूर्णत्व देते.

बालकुमार साहित्य संमेलन ज्या नगरीत आयोजित केले आहे, ती भोसे (क.) ही नगरी या सांस्कृतिक श्रीमंतीचे आदर्श उदाहरण म्हणता येईल. कारण या नगरीने सुमारे तीन हजार विद्यार्थ्यांचा हा भव्य-दिव्य मेळावा आयोजित केलेला आहे. हे संमेलन मुलांचे नसून फुललेल्या फुलांचे संमेलन म्हणावे इतके देखणे झालेले आहे. या निमित्ताने सुमारे ८०० हून अधिक मुलांनी ग्रंथदिंडीत सहभाग घेतलेला होता. अनेक वंदनीय स्त्री-पुरुषांच्या धारण केलेल्या वेशभूषा



# मुलांचे नव्हे तर फुललेल्या फुलांचे संमेलन

सर्वांचे लक्ष वेधून घेत होत्या. ढोल-ताशे, टाळ-मृदंग आणि शिंगाची तुतारी यामुळे सारी नगरी नादब्रह्माने खळाळत होती. ग्रामदेवतेच्या यात्रेवेळी जमणारी गावकऱ्यांची गर्दी या सोहळ्याला शोभा आणणारी आहे. त्यांचा उत्स्फूर्त आणि उत्साही सहभाग; नेटके नियोजन, बाल-कुमारांचे फुललेले चेहरे आणि त्यांनीच केलेले सूत्रसंचालन या साऱ्या गोष्टी भोसे नगरीची सांस्कृतिक श्रीमंती व्यक्त करणारी होती. ग्रामीण भागातून आलेल्या या मंडळींना अशा कार्यक्रमाची किती भूक आहे, याचे हे संमेलन निदर्शक म्हणता येईल.

अशा या बालकुमार साहित्य संमेलनासारख्या सांस्कृतिक उपक्रमातून काय साधते, असा प्रश्न अनेकांच्या मनात निर्माण होत असेल. या प्रश्नाचे उत्तर असे की, मुलांच्या ठायी असलेली प्रतिभा व कल्पकता यांचा विकास होण्यास ही संमेलने उपयोगी पडतात. त्यांना पोषक वातावरण मिळते. त्यांच्या निर्मितीला थोडीफार ऊर्जाही मिळून जाते. जिल्हा परिषदेच्या शाळेत शिकणारी इयत्ता सहावी-सातवीतली मुले त्यांच्या स्वयंप्रकाशी प्रतिभेचे दर्शन घडविणाऱ्या उत्तम कविता लिहून जातात अन् तेही कुणाचे मार्गदर्शन न घेता. अशा या काही कवितांचा मी उल्लेख केला तर तो अनाठायी ठरू नये. शुभांगी कदम नावाची कन्या लिहिते :-

*एक होता उंदीर। त्याला दिसले मंदिर।।*
*मंदिरात होता पेढा। उंदीर झाला वेडा।।*
*पेढा घेतला हळूच। नाही दिलं कळूच।।*
*तेवढ्यात आले पुजारी। उंदीरमामाची उडाली भंबेरी।।*
*पळता पळता मामा म्हणाले।*
*पुजाऱ्यापेक्षा आम्ही भले।।*

या छोट्याशा कवितेतून आजकालचे पुजारी आणि पुरोहित निखळ भाकरीसाठी पूजा-अर्चा करीत नाहीत; पुण्यकर्म म्हणून देवाची साधना करीत नाहीत; कष्टाविना पोटाला अन्न देणारा एक व्यवसाय म्हणून त्याकडे पाहतात. तसे आचरण करतात. त्यांनी धर्मालाच धंद्याचे रूप प्राप्त करून दिलेले आपण सर्वत्र पाहतो. धर्मभावनेला आणि पूजाविधीला आलेले हे स्वार्थी रूप बारा वर्षांची छोटीशी कन्या गेयतापूर्ण रचनेतून व्यक्त करते, ही केवढी नवलपूर्ण गोष्ट म्हणावी लागेल. साहित्याच्या दृष्टीने या छोट्याशा कवितेचे वैशिष्ट्य असे की, या मुलीच्या कवितेला अंगभूत गेयता आहे. यमक रचना साधलेली आहे. आणि एका छोट्याशा प्रसंगाला कलात्मक रूप देण्यात मी यशस्वी झाली आहे. तिच्या ठायी असणारे हे काव्यगुण फुलविण्यासाठी अशी संमेलने उपयोगी पडतात, यात शंकाच नाही.

इयत्ता सहावीत शिकणाऱ्या आकाश पाटील याच्या कवितेतील फक्त दोन-चार ओळी वाचल्या तरी या मुलाची प्रतिभा व कल्पकता कशी अव्वल स्वरूपाची आहे, हे आपणास सहज ध्यानात येते. तो म्हणतो -

*माझी आई थोर माउली। आहे ती वृक्षाची साऊली।।*
*आई करते माझ्यावर माया। जशी वृक्षाची दाट छाया।।*

कु. धनश्री जाधव या सातवीत शिकणाऱ्या मुलीने आईवरच केलेल्या कवितेत ती म्हणते-

*आई घरात राबते। आई रानात राबते।*
*तिच्या दुःखात खोल उरात। गाते आनंदाच्या सुरात।।*

या मुलांच्या कविता माधव ज्युलियन, कवी यशवंत, नारायण सुर्वे यांच्या कवितेइतकी उद्या-परवा उंच होईल, असा विश्वास बाळगायला हरकत नाही. 'चिंध्या शिवून झाकते अंग। तरीही म्हणते माझ्या संसाराला इंद्रधुनष्याचे रंग।' या ओळी प्रतिभावंत कवीच्या कवितेसारख्या वाटत नाहीत का?

सारांश असा की, बालकुमार साहित्य संमेलने मुलांच्या व्यक्तिमत्त्वाचा सर्वांगीण विकास करण्यास कारणीभूत ठरतात. त्यांच्या ठायी साहित्याची गोडी निर्माण होते.

**सांस्कृतिक श्रीमंती म्हणजे जिथे संगीत, नाट्य, चित्र आणि शिल्प यांची प्रदर्शने असतात, सोहळे असतात. जिथे सभा-संमेलनांचे उपक्रम होतात, जिथे नानाविध क्रीडास्पर्धांचे आयोजन केले जाते. जिथे व्याख्याने व व्याख्यानमाला आयोजित केल्या जातात आणि सामूहिक जीवनाचा आविष्कार घडतो; तिला सांस्कृतिक श्रीमंती म्हणता येईल. तिथला समाज मनाने निरोगी बनलेला असतो.**

म्हणूनच त्यांच्या मनात संस्कारांची पेरणी होते. या वयातच जीवनाला श्रीमंत करणाऱ्या सेवा, सदाचार, सद्‌विचार, चारित्र्य, श्रमप्रतिष्ठा, करुणा, त्याग, माणुसकी यांसारख्या चिरंतन मूल्यांचे महत्त्व समजून येते. अशा संमेलनातून भल्या-बुऱ्या साहित्याचे भान निर्माण होते आणि पालकांनाही आपल्या मुलांची नव्याने ओळख होते. अभ्यासाऐवजी कविता करणाऱ्या आपल्या मुलांना रागावणाऱ्या पालकांनाही कविता किती प्रतिष्ठित आणि कौतुकास पात्र गोष्ट आहे, याची या संमेलनातूनच ओळख होत असते. आणि ग्रामीण भागात होणाऱ्या संमेलनातून या मुलांना हक्काचे एक व्यासपीठही उपलब्ध होते, यात शंका नाही. म्हणून अशा सांस्कृतिक कार्यक्रमाकडे फायदा-तोट्याच्या व्यावहारिक दृष्टिकोनातून पाहणे गैर म्हटले पाहिजे.

एवढेच नव्हे तर अशा सांस्कृतिक कार्यक्रमातून कर्मकांडाने माखलेल्या धर्माचरणाचे शुद्धीकरण होते. त्यातून नव्या धर्माची ओळख होते. धर्म म्हणजे पूजा-पाठ, प्रार्थना आणि उपवास नव्हे. धर्म म्हणजे तीर्थाच्या ठिकाणी जाऊन स्नान करणे नव्हे. धर्म म्हणजे देवाच्या नावाने केलेल्या मिष्टान्नावर ताव मारणे नव्हे. मंदिराच्या प्रत्येक पायरीवर दिवे लावून मंदिराला प्रकाशमान करणे म्हणजे धर्म नव्हे; तर धर्म म्हणजे माणसात असलेल्या 'ईश्वरी' रूपाला ओळखणे होय. माणसाला माणसाशी जोडणारा, माणसाला उन्नत आणि विशुद्ध करणारा, माणसाच्या विकृतीला सत्प्रवृत्तीत बदलणारा, काळाची चौकट ओलांडून जाणारा प्रवाही आणि चिरंतन विचार म्हणजे खरा धर्म होय. अशा या धर्माची ओळख सांस्कृतिक कार्यक्रमातून होत असते. आणि त्यात सहभागी झालेल्या श्रोत्यांच्या मनावर त्याचा खोल परिणाम होत असतो. अशा प्रकारचे संस्कार बालवयात अधिक चांगले होत असल्याने अशी बालकुमार साहित्य संमेलने फार आवश्यक मानली पाहिजेत. त्यातूनच आपल्या समाजात खोलवर रुजलेल्या अनिष्ट परंपरा आणि घातक रीतीरिवाज कमी होण्यास मदत होते. एवढेच नव्हे तर अशा कार्यक्रमांतूनच जगण्याचे निःश्रेयस समाधान प्राप्त होते. हे समाधान किंवा निकोप आनंद इतर कोणत्याही गोष्टींतून आपणाला प्राप्त होत नाही. तो उंची वस्त्रे आणि भरपूर अलंकार परिधान करून होत नाही. आवडणारा पदार्थ आकंठ खाल्ला तरी त्यातून प्राप्त होत नाही. सुखसोयींनी संपन्न असलेल्या राजमहालात राहिल्याने तो मिळत नाही. लबाड आणि लाचार हुजरेकऱ्यांनी केलेल्या दहा-वीस नमस्कारांतून हे निःश्रेयस समाधान लाभत नाही किंवा स्वर्गीय रूप असलेल्या लावण्यवतींच्या कामक्रीडेतूनही ते प्राप्त होत नाही. कारण या साऱ्या गोष्टी इंद्रियासक्तीशी निगडित असतात. मनाशी नसतात. मनाचे भरण-पोषण करण्यासाठी या लौकिक बाबींच्या पलीकडे असलेल्या साहित्य व कलांचाच आपणाला आस्वाद घ्यावा लागतो. आजकाल तरुण पिढी व्हाट्सॲप, फेसबुक आणि दूरदर्शनच्या अवास्तव आणि अतिरंजित अशा सुमार मालिका पाहण्यात धन्यता मानते. त्यातच शाश्वत सुख शोधण्याचा प्रयत्न करीत असतो; पण या आभासी जगामधील संचार त्यांना दिशाहीन बनवतो. खऱ्याखुऱ्या जीवनापासून तोडतो आणि त्यातूनच एक कशानेही भरून न येणारी पोकळी निर्माण होते आणि ती रोजच्या जीवनात संकटे आणि संघर्ष यांच्याशी झुंज घेताना हतबल करते. माणूस अशा वेळी 'आतून-बाहेरून' एकाकी बनतो. कोरडा बनतो. त्यातूनच त्याच्या जगण्याला डागाळलेल्या लक्तराची अवस्था प्राप्त होते. म्हणून आज जीवनाला पूर्णत्व प्राप्त व्हायचे असेल तर सांस्कृतिक कार्यक्रमांची साधना आवश्यक आहे, यात शंका नाही.

या साऱ्या गोष्टी लक्षात घेतल्या तर मला असे मनापासून वाटते, की महाराष्ट्रातल्या साऱ्या साहित्यसंस्थांनी ग्रामीण पातळीवर जाऊन काम केले पाहिजे. तिथे व्याख्याने, परिसंवाद, संमेलने आणि मान्यवरांचे स्मृतिदिन साजरे केले पाहिजेत. अशा कार्यक्रमांवाचून ग्रामीण माणूस कमालीचा उपाशी आहे. त्यांना अशा कार्यक्रमांची खूप गरज आहे. या संमेलनास भोसे गावचे गावकरी आलेले आहेतच; पण आजूबाजूच्या आठ-दहा खेड्यांतील ग्रामस्थ आणि विद्यार्थी उपस्थित आहेत, हे कशाचे लक्षण आहे? आत्म्याला असलेल्या भुकेची तृप्ती करण्याचा त्यांचा हा प्रयत्न आहे. त्याचे हे लक्षण आहे. ग्रामीण भागात घेतलेल्या अशा कार्यक्रमांमुळे-

१. मराठी भाषा या जागतिकीकरणाच्या झंझावातामध्येही ताठ मानेने टिकून राहील- नव्हे अधिक फोफावेल. कारण मराठी भाषेचा वापर ग्रामीण माणूसच अधिक प्रमाणात करीत असतो आणि पुढेही करणार आहे.

२. अशा संमेलनांमुळे प्राथमिक आणि माध्यमिक शाळांतील विद्यार्थ्यांना मराठीची गोडी निर्माण होईल. त्यातून वाचनसंस्कृतीचाही विस्तार होईल.

३. साहित्य हा कोणत्याही संस्कृतीचा एक प्राणभूत घटक मानला जातो. कोणत्याही राष्ट्राची श्रीमंती त्या

**“ माणसाला माणसाशी जोडणारा, माणसाला उन्नत आणि विशुद्ध करणारा, माणसाच्या विकृतीला सत्प्रवृत्तीत बदलणारा, काळाची चौकट ओलांडून जाणारा प्रवाही आणि चिरंतन विचार म्हणजे खरा धर्म होय. अशा या धर्माची ओळख सांस्कृतिक कार्यक्रमातून होत असते. आणि त्यात सहभागी झालेल्या श्रोत्यांच्या मनावर त्याचा खोल परिणाम होत असतो. अशा प्रकारचे संस्कार बालवयात अधिक चांगले होत असल्याने अशी बालकुमार साहित्य संमेलने फार आवश्यक मानली पाहिजेत. त्यातूनच आपल्या समाजात खोलवर रुजलेल्या अनिष्ट परंपरा आणि घातक रीतीरिवाज कमी होण्यास मदत होते. एवढेच नव्हे तर अशा कार्यक्रमांतूनच जगण्याचे नि:श्रेयस समाधान प्राप्त होते. हे समाधान किंवा निकोप आनंद इतर कोणत्याही गोष्टींतून आपणाला प्राप्त होत नाही. ”**

देशाच्या साहित्याद्वारे मोजली जाते. 'अर्ध्या जगावर असणारे आमचे साम्राज्य नष्ट झाल्याचे दु:ख नाही; पण आमचा शेक्सपियर साऱ्या जगावर राज्य करतोय, ही आमच्या दृष्टीने आनंदाची आणि अभिमानाची बाब आहे,' असे मानणारा ब्रिटिश लेखक साहित्यालाच श्रेष्ठत्व देतो आहे. म्हणून संस्कृतीच्या संवर्धनासाठी अशा कार्यक्रमांची आज नितांत गरज आहे. तसेच

४. पाश्चात्त्य संस्कृतीच्या आंधळ्या अनुकरणामुळे आज चंगळवादाला फार मोठी प्रतिष्ठा प्राप्त झाली आहे. 'खा, पी, मजा कर. उगवलेला आजचा दिवस आपला. उद्याची खात्री नाही. म्हणून शारीर सुखोपभोगांचा पुरेपूर आस्वाद घे,' अशी धारणा आज शिष्टसंमत झाली आहे, पण हा चंगळवाद मनाला उपाशी ठेवून शरीराचे चोचले पुरवितो, याचा आपण विचारच करीत नाही. शारीरसुखाच्या पलीकडेही जीवनाचा आनंद नांदतो याचे भानच आम्हाला राहिलेले नाही. त्यामुळे पद, पैसा, प्रतिष्ठा आणि प्रसिद्धी यांच्या पलीकडे कृतार्थ जीवनाचे नंदनवन असते, याचे आम्हाला विस्मरण झालेले आहे. मानवी जीवनाला अनुभवसंपन्न आणि कृतार्थ करणारे सांस्कृतिक कार्यक्रम मोठ्या प्रमाणात झाले तरच चंगळवादाचे आकर्षण कमी होईल, यात शंका नाही.

आज आपल्या जीवनावर जागतिकीकरण, आवेगी तंत्रज्ञान, मुक्त अर्थव्यवस्था आणि चेहरा नसलेली भांडवलशाही यांचे सर्व बाजूंनी आवेगी आक्रमण सुरू आहे. अवघ्या जगालाच 'ग्लोबल व्हिलेज'चे स्वरूप येऊ लागले आहे. भारतासारख्या विकसनशील देशातील भाषा, शिक्षण, शेती, जीवनमूल्ये, संस्कृती यांच्यावर खोल परिणाम होत आहे. त्यातून अनेक भले-बुरे परिणाम आपल्यावर होणार आहेत. आजघडीलासुद्धा ते होत आहेत. या दुष्परिणामाचे प्रतीक म्हणजे आपण आज निसर्गापासून तुटत चाललो आहे. भूमीपासून तुटत चाललो आहोत, नात्यापासून तुटत चाललो आहे. माणसापासून तुटत चाललो आहोत आणि कोसळणाऱ्या सुख-वर्षावापासून, आत्मिक शांतीपासून तुटत चाललो आहे. माणसाचे यंत्र होत चालले आहे. त्याला खरेदी-विक्रीचे स्वरूप येत चालले आहे. सर्व बाजूंनी सुरू झालेले हे तुटलेपण जोडण्यासाठी, त्यातून भाषा आणि संस्कृती सक्षम करण्यासाठी मराठी साहित्यसंस्थांनी पुढाकार घेतला पाहिजे आणि ग्रामीण भागापर्यंत आपली संस्था नेली पाहिजे. नाहीतर आणखी काही वर्षांनी मराठी केवळ बोलीभाषेच्या रूपातच शिल्लक राहण्याची शक्यता नाकारता येत नाही.

मोठ्या संख्येने या संमेलनात सहभागी झालेल्या विद्यार्थ्यांशी संवाद साधताना मी सूत्ररूपाने असे म्हणेन की-

१. मुलांनो, तुम्ही भरपूर वाचन करा.
२. सुचेल तेव्हा लेखन करा. चित्रे काढा.
३. वाढदिवसाला नवे कपडे घ्याच, पण पुस्तकांचीही मागणी करा.
४. मोबाईल आणि दूरदर्शनच्या आभासी जगात फार काळ वावरू नका.
५. शाळेसाठी-गरिबांसाठी आणि आपल्या गावासाठी थोडा वेळ द्या.
६. तुमचा हात मैत्रीसाठी पुढे यावा.
- कौतुकासाठी पाठीवर जावा.
- प्रेमासाठी गळ्यात पडावा.
- आधारासाठी खांद्यावर असावा.
- नम्रतेसाठी पायाशी झुकावा.
- आणि आनंदासाठी आकाशाकडे जावा.

त्यामुळेच तुम्ही घराचे लाडके व्हाल.
शाळेचे लाडके व्हाल.
आणि साऱ्या समाजाचेही लाडके व्हाल!

●

- द. ता. भोसले
मोबाइल : ९४२२६४६८५५



अनुक्रमणिका

# प्रातिनिधिक मराठी साहित्यात आजवर उमटलेले पर्यावरण

लेख

संतोष शिंत्रे

**खरेतर मुळात साहित्य हीच मुळी एक सामाजिक प्रक्रिया आहे. आणि मानवी संदर्भातच पाहिले, तर निसर्ग, पर्यावरण याकडे 'स्वयमेव' न पाहता त्यातल्या घडामोडी या आपण सामाजिक प्रक्रिया म्हणूनच पाहतो. कारण आपल्याला खरे स्वारस्य असते ते या दोन्ही घटकांच्या मानवी जीवनावर पडणाऱ्या प्रभावामध्ये. म्हणूनच साहित्याच्या समाजशास्त्रात तत्कालीन निसर्ग, तत्कालीन पर्यावरण हा भाग कितपत उमटला आहे, याचाही अभ्यास व्हायला हवा. सदर विषयाच्या अधिकृत अभ्यासक्रमांमध्ये असा अभ्यास आजमितीला आणि पूर्वीही अंतर्भूत होता का, याची माहिती माझ्याकडे नाही. पण बहुधा नसावा. मराठी समीक्षेनंही साहित्याच्या या पैलूकडे फारसं तपशिलाने पाहिल्याचं आढळत नाही.**

तौलनिक साहित्य म्हणजेच Comparative literature ही एक महत्त्वाची विद्याशाखा. काही एका विशिष्ट अभ्यासपद्धतीने ती साहित्य आणि अन्य अभ्यासक्षेत्रांमधले आंतरसंबंध, परस्परांवर त्यांचे होणारे परिणाम याचा शोध घेते. त्यातून काही संशोधनपर निरीक्षणे नोंदवते. एखाद्या लेखकाच्या किंवा साहित्यकृतीच्या घडणीत त्याच्या भोवतालच्या सामाजिक संदर्भांचा, घटनांचा, परिस्थितीचा काय अन् किती वाटा आहे? किंवा एखाद्या ग्रंथात तत्कालीन महत्त्वाच्या सामाजिक घटनांचे संदर्भ किती उमटलेले दिसतात, या सगळ्या गोष्टी साहित्याच्या समाजशास्त्रीय अभ्यासात पाहाव्या लागतात. अशा लेखनाचा समाजमनावर निश्चित काही परिणाम होतो. त्याअर्थी हे आंतरविद्याशाखीय संशोधन क्षेत्र आहे.

उलट बाजूने पाहिले, तर पर्यावरणीय संवादशास्त्रातही (environmental communication) सालंकृत, जराशा फुलवलेल्या, ललित भाषेतून साधलेल्या संवादाला, म्हणजेच 'ऱ्हेटॉरिक'ला अत्यंत महत्त्वाचे स्थान आहे. पर्यावरणीय संवादशास्त्रातल्या सात मूलभूत प्रकारच्या संवादांमधील हा एक महत्त्वाचा प्रकार मानला गेला आहे. काय आहेत हे सात प्रकार? अलेक्झांडर फ्लोर (२००४) या आद्य पर्यावरण संवाद शास्त्रज्ञानं पर्यावरणीय संवादाचे सात प्रकार सांगितले, त्यात क्रमांक एक वर 'ऱ्हेटॉरिक'च आहे. म्हणजे मनपरिवर्तनासाठी/मतपरिवर्तनासाठी काहीशा फुलोरा असणाऱ्या ललित /लेखन, अथवा भाषण यातून साधलेला संवाद. दुसरा प्रकार म्हणजे माध्यमे आणि निसर्ग पर्यावरण पत्रकारिता यांमार्फत साधला जाणारा संवाद. पर्यावरणविषयक एखाद्या मूलभूत अथवा धोरणात्मक गोष्टीच्या निर्णयातील लोकसहभाग हा तिसरा प्रकार. सामाजिक विपणन (social marketing) आणि एखाद्या गोष्टीच्या भलावणीसाठी, समर्थनासाठी केलेल्या चळवळी, आंदोलनं हा चौथा प्रकार. पाचव्यात पर्यावरणविषयक परस्पर सामंजस्याचे/सहकार्याचे करार आणि चर्चेद्वारा पर्यावरण प्रश्नांवर उपाय काढणे याचा समावेश होतो. एखाद्या घटनेपासून, प्रक्रियेपासून काय, कसा आणि किती पर्यावरणीय धोका उत्पन्न होतो, याबाबतची माहिती जनतेपर्यंत पोहोचवणे हा सहावा प्रकार. आणि सर्वसामान्य संस्कृतीतील निसर्ग-पर्यावरणाचे आविष्करण आणि हरित विपणन (green marketing) हा सातवा प्रकार. 'ऱ्हेटॉरिक' हा शब्द आपण बऱ्याच वेळा नकारात्मक रीतीने वापरतो, पण त्याचा मूळ अर्थ तसा नाही. संस्कृत वाङ्मयाच्या अभ्यासात याचा अर्थ 'अलंकारशास्त्र' असा घेतला जातो. प्रस्तुत विवेचनातही याच अर्थी हा शब्द योजला आहे. याविषयी आणखी माहिती पुढे पाहूच.

खरेतर मुळात साहित्य हीच मुळी एक सामाजिक प्रक्रिया आहे. आणि मानवी



संदर्भातच पाहिले, तर निसर्ग, पर्यावरण याकडे 'स्वयमेव' न पाहता त्यातल्या घडामोडी या आपण सामाजिक प्रक्रिया म्हणूनच पाहतो. कारण आपल्याला खरे स्वारस्य असते ते या दोन्ही घटकांच्या मानवी जीवनावर पडणाऱ्या प्रभावामध्ये.

म्हणूनच साहित्याच्या समाजशास्त्रात तत्कालीन निसर्ग, तत्कालीन पर्यावरण हा भाग कितपत उमटला आहे, याचाही अभ्यास व्हायला हवा. सदर विषयाच्या अधिकृत अभ्यासक्रमांमध्ये असा अभ्यास आजमितीला आणि पूर्वीही अंतर्भूत होता का, याची माहिती माझ्याकडे नाही. पण बहुधा नसावा. मराठी समीक्षेनंही साहित्याच्या या पैलूकडे फारसं तपशिलाने पाहिल्याचं आढळत नाही.

मराठी साहित्याच्या समाजशास्त्राचा अभ्यास मानवी जीवनाचं इतकं महत्त्वाचं अंग वगळून यथायोग्य रीतीने पुढे जाईल का? अर्थात साहित्याच्या अंगानं पाहायचं झालं, तरी पर्यावरणाच्या बरोबरचं समाजशास्त्र ही अभ्यासाची निव्वळ एक दिशा असू शकते. भालचंद्र नेमाडे म्हणतात त्यानुसार समाजशास्त्रीय दृष्टिकोन, परिस्थिती यांचा सर्जनाशी, निर्मितीशी थेट संबंध नसतो; किंवा एखाद्या कलाकृतीचं अंतरंग काय असावं, त्याची आंतरिक रचनातत्त्वं काय असावीत यांच्याशी सुद्धा त्यांचा संबंध नसतो. बऱ्याच वेळा साहित्याची आणि समाजशास्त्राची मूल्ये भिन्न असू शकतात. समाजिक, नैतिक आणि सौंदर्यशास्त्रीय मूल्ये एकमेकांना पूरक असतीलच असं नाही. काही साहित्यकृती या संपूर्णपणे 'न-नैतिक' असू शकतात, स्वतःच्या व्यक्तिगत अनुभवांना वाहिलेल्या असू शकतात, पण तरीही त्यांच्यात एक अस्पष्ट सामाजिक संदर्भ असतो. हेच प्रतिपादन निसर्ग, पर्यावरण या गोष्टी आणि साहित्य यांनाही जसंच्या तसं लागू आहे. र.वा.दिघ्यांच्या बऱ्याच कथाबीजांमध्ये 'लॅंडस्केप इकॉलॉजी'ची मूलतत्त्वे दिसतात, ती याचमुळे असावीत.

मग साहित्य निर्माण तरी कुठून होतं? पुन्हा नेमाड्यांचीच उसनवारी करून म्हणायचं झालं, तर माणूस समाजात जरी राहत असला, तरी त्याच्या आंतरिक गरजा वेगळ्याच असतात. सर्जक व्यक्तींच्या आंतरिक गरजा कुठल्याच समाजात पूर्ण होत नाहीत. त्यांना एक वाट करून देण्यासाठी बहुतांश साहित्य उमटतं. त्यामुळे एकाच लेखकाच्या लेखनात, किंवा एकाच कुठल्या साहित्यात तत्कालीन निसर्ग-पर्यावरणाचा समग्र पट सापडणं अवघड आहे.

काही कालखंड एखाद्या विशिष्ट सामाजिकतेचं चित्रण अधिक उमटवतात, तर काही एका काळातील साहित्यात 'सुरम्य'पणा जास्त आणि सामाजिकता कमी असंही दिसू शकतं. हे सगळं त्या त्या काळातले सामाजिक सिद्धांत काय आहेत, यावर ठरतं. पण तरीही तौलनिक सामाजिक आढावा घेण्यासाठी तत्कालीन समाजाचं आर्थिक, नैतिक, राजकीय जीवन समजण्यासाठी साहित्य हे सर्वाधिक विश्वसनीय साधन मानलं जातं. निसर्ग, पर्यावरण आणि त्याचे मानवी जीवनावर झालेले भलेबुरे परिणाम तपासण्यासाठी मराठी साहित्य हे असं साधन कितपत मानता येईल, तेच आपण पाहणार आहोत.

आणि हा तौलनिक आढावा आपण कुठल्या कालखंडातला घेणार आहोत तेही ठरवून घेणं आवश्यक.

सदर विवेचनापुरता हा काळ साधारण इंग्रजी राजवट भारतात स्थिरावल्यापासून (१८६५) ते नव्या शतकातल्या पहिल्या १७ वर्षांपर्यंत (२०१७) असा ठरवून घेतला आहे.

शिवाजी महाराजांचा जन्म (१६३०) ही महाराष्ट्राच्या संदर्भातली एक पथदर्शी घटना. त्याच्या काहीशा आधीपासूनच्या काळात ते तिथून पुढची शंभर एक वर्षं, तत्कालीन संतसाहित्यातून वेळोवेळी असे उल्लेख आढळतातच. त्यांच्याशी आपण अति-परिचित आहोत. (वृक्षवल्ली आम्हा....इत्यादी) या साहित्याची आपली इतकी नाळ जुळली आहे की सदर विवेचनात त्याची पुनरावृत्ती केलेली नाही. तसंच शिवरायांच्या काळात निदान राजांना धारणक्षमता (sustainability) या गोष्टीची चांगलीच जाण होती, हे त्यांच्या अनेक पत्रांवरून दिसतं. पण एकूणच १६०० ते १८५७ हा काल सतत आक्रमणे, लढाया, संघर्ष यांनी व्यापलेला होता. कोकण किंवा देशावरचे घनदाट जंगलराजीचे काही मर्यादित पट्टे सोडले तर बाकी महाराष्ट्र हा उजाड, रोजच्या जगण्याची निसर्गाशी असलेली नाळ तुटत चाललेला असा होत

होता. १८५७ नंतर इंग्रज सरकार स्थिरावत गेलं. त्यामुळे वर्ण्य विषयाशी संबंधित साहित्य व्यवहार १८६५ पर्यंत फारसा आढळणार नाही. ते स्थिरावल्यावरची सर्वांत महत्त्वपूर्ण आणि तत्कालीन निसर्ग, समाज जीवन यावर निरंकुश प्रभाव टाकणारी घटना म्हणजे १८६५ मध्ये लागू झालेला इंग्रजांचा वनविषयक कायदा. १८७८ पर्यंत-जेव्हा त्याची व्याप्ती वाढत गेली तिथपर्यंत, महाराष्ट्राच्या समाजजीवनावर त्याचे अत्यंत गंभीर परिणाम झाले. अनेक कुशल कारागिरांवर बेकारीची कुऱ्हाड कोसळली. शेतीवरचा ताण वाढत गेला, पण यातले कुठलेच ताणतणाव तत्कालीन साहित्यातच काय, एखादा 'केसरी'सारखा अपवाद वगळता, तत्कालीन पत्रकारितेत, वार्तांकनात देखील उमटलेले दिसत नाहीत.

एकोणिसाव्या शतकाची अखेर ते विसाव्या शतकाची पहिली वर्षे - म्हणजे साधारण पन्नास वर्षांचा काळ. तो महत्त्वाचा अशासाठी की याच काळात महादेव कोळी, भिल्ल, वारली, यांचे इंग्रजांच्या वननीती विरुद्ध सशस्त्र, सशक्त उठाव होत होते. रघुजी भांगरे, भागोजी नाईक अशा अनेक नेत्यांना फासावर चढवलं जात होतं आणि असे उठाव महाराष्ट्रात सर्वदूर म्हणजे जुन्नर, आंबेगाव, राजूर, ओतूर, त्र्यंबकेश्वर, मोरवाडा, भीमाशंकर, सापुतारा, इगतपुरी, घोटी, कर्जत असे सर्वत्र होत होते. १८८९ नंतरच्या अशाच एका लढ्याचं नेतृत्व वासुदेव बळवंत फडके यांनीही केलं होतं. १८८९ नंतरच्या दुष्काळानंतर परिस्थिती आणखी वाईट झाली. हे तपशीलही तत्कालीन मराठी साहित्यात दूरान्वयानेही उमटलेले आढळत नाहीत. एकटा केसरी मात्र जागरूकतेने या सर्व घटना नोंदवत होता. मराठी साहित्यात या गोष्टी खूप नंतर उमटल्या. डॉक्टर गोविंद घारे यांचं 'सह्याद्रीतील महादेव कोळी' हे पुस्तक १९७४ साली आलं तर कॉम्रेड गोदावरी परुळेकर यांचं 'जेव्हा माणूस जागा होतो' मौजनं १९६९ साली प्रकाशित केलं. त्यात या उठावांची वर्णनं आहेत. त्याआधी काहीसं वेगळे पैलू मांडणारं अत्यंत उल्लेखनीय पुस्तक म्हणजे त्रिंबक नारायण आत्रे यांचं 'गावगाडा'. सदर विवेचनात त्याच्या उल्लेखाशिवाय आपण पुढे जाऊच शकत नाही. पण इतक्या महत्त्वाच्या कालखंडाचे उल्लेख निदान नंतर का होईना उमटले हेही नसे थोडके!

१९२० ते आजवर (२०१७) चा काळ आपल्याला सर्वांनाच खूप परिचित आहे. त्यातल्या ठळक घटना आपल्याला चांगल्या माहिती आहेत. त्यामुळे या काळातल्या साहित्यप्रकारांकडे आपण काळ विवेचन न करता थेट पाहू शकू. कुठले साहित्यप्रकार? एक तर संदर्भ-संशोधनपर साहित्य. दुसरा प्रकार म्हणजे निसर्ग-पर्यावरणविषयक काही वैचारिक मांडणी, वैज्ञानिक मांडणी सामान्य वाचकांसाठी करू पाहणारे लेखन. नशिबाने या दोन्ही प्रकारांमध्ये मराठीला एक पुष्ट, सशक्त परंपरा लाभली आहे. आणि अर्थात ललित साहित्य-म्हणजे कथा, कादंबऱ्या, कविता, नाटकं हे सगळं. (हे विषय हाताळलेली नाटकं जवळजवळ शून्य!) आणि साहित्याचं उपांग म्हणता येईल असं, पण जनमानसासाठी महत्त्वाचं अंग म्हणजे पत्रकारिता. जसं त्याला 'History in Hurry' म्हणतात, तसंच ते literature in hurry पण असू शकतं.

कादंबरीपुरता विचार करायचा झाला, तर १९५० पर्यंतच्या काळात 'प्रेम' ही एकच संकल्पना कादंबरीचा विषय म्हणून प्रामुख्याने हाताळली जात होती. नेमाड्यांच्याच शब्दात सांगायचं झालं, तर खांडेकर, फडके, माडखोलकर, रेगे, खानोलकर, पु.य.देशपांडे, ही आणि आसपासची बरीच मंडळी प्रेमाच्या या 'रोमँटिक' थैमानात सापडलेली आपल्याला आढळतात. स्वतः मुंबईत राहून रत्नागिरीच्या निसर्गाबाबत उसासे सोडणे, ही प्रवृत्तीही याच काळात जोम धरू लागली.

भारतीय मूल्यांचा, परंपरांचा तत्कालीन निसर्ग-पर्यावरणाशी, रोजच्या जगण्याशी असलेला आत्मिक संबंध सहजसुंदरपणे उलगडणारी 'श्यामची आई' १९३३ मध्ये आली. विसाव्या शतकातली सदर विषयासाठी अत्यंत उल्लेखनीय, श्रेष्ठ कलाकृती म्हणजे 'बनगरवाडी'. निसर्गप्रधान साहित्यातलं एक मानाचं पान. कादंबरीभर तिथला निसर्ग, तिथलं पर्यावरण, जगण्यावर होणाऱ्या त्याच्या भल्या बुऱ्या परिणामांसह जणू काही कादंबरीतील एक पात्र म्हणूनच आपल्यासोबत राहतात. आधी ज्या रोमँटिक 'थैमाना'चा उल्लेख केला, त्यातून आपल्या ताकदवान, रसरशीत पण कृष्णगडद विनोद आणि पात्रे यांमुळे सुटलेली आणि हलकेच निसर्गाविषयी काही सांगून जाणारी आणखी एक श्रेष्ठ कादंबरी म्हणजे जयवंत दळवी यांची 'सारे प्रवासी घडीचे'.

या संपूर्ण विवेचनात कितीही प्रयत्न केला तरी काही उदाहरणे राहून जाणार. असे राहून गेलेले उल्लेख क्षम्य मानावेत. पण हे संपूर्ण विवेचन ज्या उल्लेखाशिवाय अपूर्ण राहील अशी एक कादंबरी म्हणजे 'माचीवरला बुधा'.. गो.नी.दांडेकर. एखादा माणूस निसर्गाला सोयरा मानून त्याच्याशी किती एकरूप, किती समरस होऊ शकतो हे चित्रित करणारी. २०१७ मध्ये त्यावर एक चांगला चित्रपटही निघाला. त्या काळात खोट्या रम्यतेत किंवा अद्भुतता इत्यादी साठी, वस्तुस्थितीपासून पळ काढण्यासाठी, निसर्गाचा वापर करण्याची प्रवृत्ती जोम धरू लागली होती. या प्रवृत्तीला ही कादंबरी हा सन्माननीय अपवाद आहे. 'वाघरू', 'पवनाकाठचा धोंडी', अशा कथावस्तूतच निसर्गाला अढळ स्थान असलेल्या गो.नी.दांच्या अन्य दोन कादंबऱ्याही आठवून जातात. जवळजवळ 'माचीवरला बुधा'च्याच पातळीवरची त्यांची अन्य एक छोटी कादंबरी, म्हणजे 'रानभुली'. गडावर स्वच्छंद विहरणारी एक निसर्गकन्या, लग्न झाल्यामुळे अचानक मुंबईच्या झोपडपट्टीत येऊन पडते. तिची तडफड, घुसमट, निसर्गापासून तुटल्याची भावना कादंबरीत फार समर्थपणे मांडली गेली आहे. बुधा मुंबईतून राजमाचीवर येतो तर 'रानभुली' गडावरून थेट मुंबईच्या झोपडपट्टीत पण कासाविशी तीच.



अनुक्रमणिका

१९८०च्या दशकातल्या एका जबरदस्त परिणामकारी कादंबरीचा उल्लेखही अनिवार्य आहे. ती म्हणजे पुरुषोत्तम बोरकर यांची 'मेड इन इंडिया'. खरंतर 'कोसला' जिथे संपते, तिथूनच 'मेड इन इंडिया' सुरू होते. 'कोसला' सारखंच आभाळाएवढं ओझं डोक्यावर घेऊन कादंबरीचा नायक विदर्भातल्या आपल्या गावी 'बरोब्बर खुंटापाशी येऊन' उभा राहिला आहे. त्याचं गावातलं आयुष्य, बरोबरीनंच दिसत राहणारा निसर्गाचा ऱ्हास, त्याबाबत फार काही करता न आल्याची खंत ही एखाद्या ठसठसत्या जखमेसारखी, वेदनेसारखी पूर्ण कादंबरीभर आपल्याबरोबर राहते. अस्सल 'वैदर्भीय भाषेत'. मधूनच 'मले समजे ना, की आपल्या लहानपणी वातावरणाचे प्रतिध्वनी होयेल मिठू, भोऱ्या, तितर चिव्ळ्या, कोकीळ, कोयशे कुठी गेले? की येन्ड्रीन संस्कृतीनं नष्ट केलं याईले?' असे प्रश्न नायकाला कादंबरीभर छळतात. रूढ अर्थाने नाही, तरी रोजच्या जगण्यात ग्रामीण भारत निसर्गापासून कसा तुटत चालला आहे, याचा अस्वस्थ ताळेबंद ही कादंबरी मांडते. अगदी शेवटालाही, आपल्याच कल्पित मरणाचं स्वप्न नायक पाहतो, ते असं : 'माह्या अनुरेनुतून हिर्वेगार डार्क ग्रीन श्वासोच्छ्वास अविरत उमटत रहातीन. या आसमंतात. मी असं चक्र होऊन जाईन या सृष्टीचं. या मातीचं.' याही कादंबरीला मराठी वाचकांचा चांगला प्रतिसाद मिळाला.

मनुष्य हे पात्रच नसणारी अनवट कादंबरी म्हणजे व्यं.दि.मांची 'सत्तांतर' अत्यंत उल्लेखनीय. अशी मनुष्यपात्र नसलेली आणखी एक कादंबरी म्हणजे २०१२ ला आलेली विद्याधर म्हैसकर यांची 'एक बुलबुल म्हणाला'. मराठीतला हा खूप वेगळा प्रयोग आहे. एका लालबुड्या बुलबुलाच्या पिल्लाचा पिलू ते बाप होणं, एवढाच प्रवास ही कादंबरी त्या बुलबुलाच्याच आत्मनिवेदनातून अत्यंत परिणामकारक रीत्या उलगडते. यातल्या निरीक्षणांचे बारकावे आणि त्यांचा कादंबरीतील तपशिलांबरोबर घातलेला मेळ मुळातूनच वाचावा असा आहे. तुलनेने नव्या लेखकांपैकी या बाबतीत उल्लेख करावा लागेल तो प्रवीण बांदेकर, महाबळेश्वर सैल, मिलिंद बोकील अशा कादंबरीकारांचा. यात बोकिलांच्या कथांमध्ये निसर्ग अधिक ठळक स्वरूपात येतो. बांदेकरांची 'चाळेगत' कोकणमधला निसर्गाचा विध्वंस उभी करते. नव्या पिढीतील निसर्गाभ्यासक मृणालिनी वनारसे यांच्या 'प्रतीक' आणि मुलांसाठी लिहिलेली 'आपलं अभयारण्य' याही अनवट वाटा चोखाळत काही सांगू पाहतात. 'आपलं अभयारण्य' सृष्टिविज्ञानातील मूलभूत संकल्पना त्यांच्याच भाषेत त्यांच्यापर्यंत पोहोचवते.

कादंबरीत अजून एका उपप्रकाराची दखल घेणे आवश्यक ठरते. तो म्हणजे अनुवादित कादंबरी.

,प्रातिनिधिक स्वरूपात यात चार-पाच कादंबऱ्या विचारार्थ घेऊ. विजय तेंडुलकर यांनी १९६३ मध्ये एका छोट्या इंग्रजी कादंबरीचा अनुवाद 'रानफूल' नावाने केला होता. हा तगडा, अप्रतिम अनुवाद तेव्हाही बहुधा वाचकांपर्यंत पोहोचला नसावा. आज मराठी वाचकांच्या तो इतका विस्मृतीत गेला आहे की, राजहंस प्रकाशनाच्या अलीकडेच निघालेल्या निवडक 'तेंडुलकर' मध्ये त्याचा उल्लेख देखील नाही. एका छोट्या मुलाला, गोऱ्या बाईसाठी रानफुलं वेचून देता देता भोवताल, आपला निसर्ग याविषयी वेगळीच समज पैदा होते. असं त्याचं थोडक्यात कथानक. Shirley Maclain Arora या नावाच्या कुण्या लेखिकेचं हे 'What then, Raman?' नावाचं हे पुस्तक. गिरीश कासारवल्ली यांचा 'बेट्टद होवू' चित्रपट त्यावर बेतला आहे.

मराठीत हे पुस्तक आता दुर्मीळच म्हणायला हवं. दुसरी आठवण एकाच कादंबरीच्या दोन अनुवादांची.

मार्जोरी रोलिंग यांच्या 'द यर्लिंग' या नितांतसुंदर कादंबरीचे दोन वेगळे अनुवाद अनुक्रमे 'पाडस' आणि 'हरीण बालक' या नावांचे-राम पटवर्धन आणि भा.रा.भागवत यांनी केले. अमेरिकेत जंगलात शांत जीवन जगणाऱ्या एका कुटुंबात पाळलेलं एक हरीण शेतीला उपद्रवकारक ठरू लागल्याने त्यांची झालेली उलघाल सांगणारी ही कथा आहे. भागवतांचा अनुवाद काहीसा छोट्या मुलांसाठी असल्याने त्यात काही तपशील गाळले होते. 'पाडस' आजपर्यंत मराठी वाचकांमध्ये लोकप्रिय आहे. 'हरिण बालक'ही पुनर्मुद्रित झाली आहे.

गुजरातीतील ख्यातनाम लेखक ध्रुव भट्ट यांच्या, अंजनी नरवणे यांनी अनुवादित केलेल्या दोन कादंबऱ्या पण अत्यंत सशक्त वाचनानुभव देतात. एक म्हणजे 'तत्त्वमसी', आणि दुसरी 'अकूपार'. या दोन अनुवादांनी मराठी निसर्ग साहित्याचं दालन अत्यंत समृद्ध झालं आहे. बंगालीतील बिभूतीभूषण बंडोपाध्याय यांची 'आरण्यक' हीही असाच एक सुन्न करणारा सशक्त वाचनानुभव देते. साहित्य अकादमीने हा मराठी अनुवाद वाचकांपर्यंत आणला.

कथांच्या बाबत विचार करायचा झाला तर त्या त्या काळातल्या घटना, चुका, अग्रक्रम यांचा प्रभाव त्या त्या वेळच्या कथांवर दिसतो. पण ढोबळमानाने पाहिलं, तर अगदी १९९० पर्यंत निसर्ग-पर्यावरण मराठी कथेत उमटणे हे दुर्मीळच म्हणावं लागतं. आणि त्याची सुस्पष्ट कारणेही विचारांती दृग्गोचर होतात.

स्वातंत्र्यापासून व्हाया नेहरू युग, १९७२च्या स्टॉकहोमच्या वसुंधरा परिषदेपर्यंत आपले अग्रक्रमच वेगळे होते. मोठमोठी धरणे, भलेबुरे संशोधन, शेतीची उत्पादकता वाढवणं या सगळ्या गदारोळात नेहरूंसारख्या निसर्गस्नेही पंतप्रधानांनाही, 'या' क्षेत्रात फार काही करायला वावच मिळाला नाही. खरंतर ई.पी.गी या निसर्गशास्त्रज्ञानं १९६० सालीच नेहरूंना पत्र लिहून भारतातल्या ढासळत्या निसर्ग समतोलाबद्दल सावध केलं होतंच, पण नेहरूंनी तिकडे दुर्लक्ष केलं. साहजिकच धोरणांमध्ये कुठे न उमटल्यामुळे आणि अग्रक्रमांमध्ये बाजूला पडल्याने, लोकांपर्यंत सहजी पोहोचणाऱ्या 'कथा' या अत्यंत सशक्त

माध्यमातूनही हे विषय उमटले नाहीत.

याच्या बरोबर उलट काही अत्यंत वाईट प्रकार मात्र कथाप्रकारात आपलं अस्तित्व याच काळात दाखवू लागले. पहिला म्हणजे जिम कॉर्बेट, केनेथ अँडरसन यांच्या तथाकथित शिकारकथांचे अनुवाद. पाठोपाठ टिनपाट देशी शिकारीही आपले फालतू अनुभव कथा म्हणून खपवू लागले. कॉर्बेटचं 'जंगल लोअर' आणि 'माय इंडिया' वगळता लिखाण काही ठिकाणी भडक, अतिरंजित आहे हे कैलाश सांखला सारख्या संशोधकांनी सप्रमाण दाखवून दिलं आहे. अशा लेखनाला मिळणारी लोकप्रियता पाहून हळूच सुमार साहित्यिक वकूबाची भानू शिरधनकर, लालू दुर्वे ही गावठी भेकड शिकारी मंडळीही कथेच्या तंबूच्या कनातीतून आत शिरली. आणि एकसुरी मूर्ख वर्णने (मी अमुक वेळी तमुक मचाणावर गेलो इत्यादी) शिकारकथा म्हणून खपवू लागली.. हे इतकं वाढलं की दस्तुरखुद्द पु.ल.नी पण त्यांची मनमुराद टिंगल केली. (हसवणूक). ही विकृती इतकी वाढली की दुर्वे किंवा तत्सम माणसाच्या शिकारकथांना राज्य पुरस्कार मिळाला. मग पुण्यात 'वाईल्ड' संघटनेचं त्याविरुद्ध आंदोलन झालं. परिणामी आता निदान शिकारकथांना राज्य पुरस्कार तरी मिळेनासे झालेत. शिकारकथा ह्या भेकड प्रकाराला कथेचं स्थान देणंच मुळी चुकीचं आहे.

सर्वसामान्य वाचकाला हवासा वाटत असतो, तो निसर्गातला थरार, त्यातलं अद्भुत, जादुई हुरहूर लावणारं वातावरण; आणि ते अनुभवल्याचा आनंद देणारं लेखन. १९८० नंतर सकस, बहुआयामी निसर्गसाहित्य येऊ लागलं, तसा हा मूर्ख प्रकार अस्तंगत होत बाजूला पडत गेला.

तरी बरे, याच काळात माडगूळकर बंधूंच्या कथालेखनातून अत्यंत रसरशीत निसर्ग उमटत होता. सध्याच्या काळात म्हणाल तर मिलिंद बोकील यांच्या बऱ्याच लेखनात मध्यवर्ती कल्पना म्हणून नसेल पण भवताल निसर्ग-पर्यावरण यांचा असतो. सदर विवेचनात त्यांच्या 'आरंभ' कथेचा उल्लेख अनिवार्य आहे. अणुयुद्धामुळे जग बेचिराख झालंय. आणि एक आदिवासी टोळी आणि एक मरत चाललेला प्रगत जगातला शास्त्रज्ञ एवढेच वाचले आहेत. आणि मरता मरता तो शास्त्रज्ञ त्यांच्यासाठी दगडांवर माणसांच्या प्रगतीची गाथा कोरून ठेवत आहे. अप्रतिम कथा.

१९९० पासून आजवर आंधळ्या विकासवेडापुढे पर्यावरणवाद्यांची टिंगल करण्याला जी प्रतिष्ठा मिळाली आहे,



त्यामुळे हे विषय कथांमधून फार कमी उमटतात. याच कालावधीतली माफिया-राजकारणी-उद्योग मार्तंड यांनी नैसर्गिक मूलस्रोतांची केलेली भयंकर लूटमार, लांडगेतोड, पर्यावरणीय न्याय सरसकट पायदळी तुडवला जाणे, कैक अब्ज डॉलर्स मध्ये पोहोचलेली वन्य जीव तस्करी, पॉस्को सारख्या आंदोलनांमध्ये आपल्याच वीसवीस हजार लोकांना सरकारनं चिरडणे अशी भरपूर 'नाट्य' असलेलीही कथाबीजे आमच्या कथाकारांना दिसतच नाहीत की काय? काही अपवाद वगळता (ज्यांमध्ये एक मीही आहे) या प्रश्नाचं उत्तर दुर्दैवाने नकारार्थी येतं. आणि जर चुकून थोडा काही भाग उमटलाच तर तो वन्य जीवांचा आकांत, आक्रंदन मांडत नाहीच. मानवकेंद्री अंगानेच उमटतो. याचं आणखी एक कारण आपल्याला ही माहिती मुख्य माध्यमांतून मिळतच नाही, हे ही आहे. त्यामुळे त्यातून काही 'प्रेरणा' मिळून काही निर्मितीची शक्यता दुरावते.

आणखी एक मोठ्ठा घोळ म्हणजे वंचित, पीडित, शोषित, उपेक्षित यांच्या वास्तवाच्या अतिबटबटीत चित्रणालाच फक्त साहित्य मानलं जाऊ लागल्यानेही अभिजात विषयांची पीछेहाट झाली आहे. त्यात निसर्ग-पर्यावरणही भरडले जातेच आहे. असे उरस्फोडी लिखाण हा खरंतर एका स्वतंत्र लेखाचा विषय आहे.

कथेकडून काव्यप्रांतात शिरलं तर पुन्हा वेगळीच परिस्थिती आहे. एकतर मराठीत कविता मायंदाळ. निर्मिती प्रचंड. उदंड. पण तरीही अर्थपूर्णता, आशयघनता, शब्दसौष्ठव यांनी अत्यंत समृद्ध असं हे दालन. पण मागच्या शतकातला एकूणच जिज्ञासा आणि किमान कुतूहल यांचा अभाव, शास्त्रीय निरीक्षणे करण्या-नोंदवण्याविषयीची अनास्था, कशापासून तरी पळवाट म्हणून निसर्गाचा स्वीकार, आसपासच्या भवतालाकडे निखळ साक्षीभावाने न पाहता आपल्या मूडनुसार निसर्ग वेठीला धरणे असे अनेक चुकीचे प्रकार मराठी काव्यात उमटताना दिसतात. मराठी कवी फक्त 'पक्षी' 'गोड गळ्याचे'/'सुंदर रंगांचे पाखरू' एवढ्यावरच थांबताना दिसतात. सदर पक्षी कोण आहे? त्याचा अधिवास काय असावा? आत्ता तरी तो आपल्याला इथे का दिसतो आहे? असे कोणतेही प्रश्न त्यांना पडताना दिसत नाहीत. आसपासच्या थक्क करणाऱ्या जैविक संपदेची, विविधतेचीही त्यांना काही फारशी 'पडलेली' दिसत नाही. विशेषतः मागील शतकातल्या काव्यात हे दोष जास्त आढळतात. आधीच कमी असलेलं कुतूहल कदाचित परवशतेमुळे पार लयालाच गेलं होतं काय? अशी रास्त शंका



अनुक्रमणिका

येते. 'अ स्पेशल इंडिया' नावाचं आता दुर्मीळ असलेलं एक पुस्तक आहे. एका सहृदय इंग्रज आय.ए.एस.अधिकाऱ्याच्या भारतातल्या आठवणी सांगणारं. त्यातली आठवण या शंकेला पुष्टीच देते. तो चिपळूणला असताना त्याला मराठी शिकवायला चिपळूणकर नावाचे एक गृहस्थ येत. त्यांना हा अधिकारी जेव्हा कुठल्याही पक्ष्याकडे बोट दाखवून हा कोणता पक्षी आहे, असे विचारी, त्या त्या वेळी त्यांचं उत्तर 'तो फक्त पक्षी आहे, साहेब'... इतकंच असायचं. तेच माशांबद्दल... 'तो फक्त मासा आहे साहेब'. आता अंगणातल्या प्राण्या-पक्ष्यांबद्दल ही आस्था, तर 'निरीक्षणे' वगैरे काय बोलणार?

परिणामी, ढोबळमानाने बहुतांश तत्कालीन मराठी कवींच्या निसर्गजाणिवा या प्राथमिक पातळीवरच थांबून राहिल्या. शाळेत आपण सगळेच जण एक चित्र काढतो. डोंगरामधून उगवणारा सूर्य, 'व्ही' आकारात उडणारी पाखरे, खाली नदी, त्यात उत्तेजनार्थ २-३ मासे, आणि काठावर एक खोपटं! ...या पातळीवर. यात कुठेही मराठी कवितेला कमी लेखण्याचा हेतू नाही. काव्य म्हणून त्यातल्या कैक अत्यंत श्रेष्ठच आहेत. प्रश्न फक्त कुतूहलाअभावी आकलन विस्तारले न जाणे इतकाच आहे. अर्थात कित्येक बावनकशी, लखलखीत अपवाद वरील प्रतिपादनालाही आहेतच.

अशा अपवादांमधला पहिला मानाचा उल्लेख अर्थातच बहिणाबाई चौधरींचा. त्यांच्या अन्य झळाळत्या काव्यगुणांच्या जोडीनंच त्यांच्या काव्यातील समग्र निसर्गभान थक्क करणारं आहे. चंद्रशेखरांची 'गोदागौरव'देखील अशीच अतुलनीय, गेय कविता. माधव यांची 'हिरवे तळकोकण'देखील कोकणातल्या तत्कालीन समृद्ध जैविक वैविध्याचा एक समग्र धांडोळाच, आपली प्रासादिकता कुठेही हरवू न देता आपल्यासमोर मांडते. हरी सखाराम गोखले यांची 'तगरीचे फूल' काव्यगुण कुठेही न हरवता त्या फुलाला जिवंत करते. ग.ह.पाटील यांची 'तिथे' हीदेखील कविता असेच एक सुनिश्चित दृश्यचित्र (लँडस्केप) डोळ्यांसमोर ठेवते. 'बगळ्यांची माळ फुले' या मराठीतल्या कदाचित सर्वश्रेष्ठ विरहगीताबद्दलही हेच म्हणता येईल. काव्यातल्या अशा दृश्यचित्रांचा विचार केला, तर अर्थात 'औदुंबर'च अढळस्थानी आहे. निसर्गावर भरभरून प्रेम करत असलेले आणि त्यामुळेच अद्वितीय काव्यनिर्मिती केलेले 'पोएट' बा.भ.बोरकरही विसरता येत नाहीत. निसर्गाचं सौंदर्यशास्त्र (Aesthetics) त्यांच्या काव्यात अत्यंत सुरेख रीतीनं उमटलं आहे.

शेतीविषयक कविता (महानोर, इंद्रजित भालेराव इत्यादी) एका मर्यादित अंगानेच निसर्गभान जागवतात. उपरोल्लेखित प्राथमिक पातळीच्या त्या अंगुळभर वरही असतात. पण तरीही त्यांचा मुख्य विषय शेती हाच राहतो.

बहुतांश मराठी कविता ही 'अवाक्' होऊन निसर्गाचे ढोबळमानाने केलेले गुणगान, वाल्मिकीप्रणीत शोक ('केवढे हे क्रौर्य'.. ना.वा.टिळक.), निसर्गप्रतीके वापरून केलेली अन्योक्ती, क्वचित काही वेळा बंदिवासातल्या प्राण्यां-पक्ष्यांविषयी सहानुभूती (हे डाळिंबाचे दाणे, वेड्या, घात तुझा करिती) इतकीच निदान गेल्या शतकापुरती मर्यादित राहिलेली दिसते. त्यामानाने संतकवींचे निरीक्षण कैक पटींनी जास्त होते. उदा. शिवथर घळीचे समर्थ रामदासकृत वर्णन. पण या विवेचनापुरती जी कालनिश्चिती करून घेतली आहे, त्यात हे येऊ शकणार नाही.

काव्यप्रांताच्या विवेचनाच्या शेवटाकडे येताना त्याचा जणू कळसाध्याय ठरवा अशा एका दिमाखदार काव्यप्रकाराकडे आपण येतो. तो म्हणजे मराठी हायकू! मराठी काव्यप्रांतातल्या निसर्गभानाचा हा आजवरचा जवळजवळ परमोच्च आविष्कार बिंदू म्हणता येईल. हायकू मध्ये केवळ तीनच ओळींमध्ये तटस्थता, व्याकुळता, वर्तमानाप्रति साक्षीभाव, निसर्गातल्या अगदी छोट्या घटिताचं केलेलं निरीक्षण आणि त्यामुळे उमटलेले काही विचारतरंग इतकं सगळं अत्यंत उत्कटपणे उमटतं. आणि हायकूची झेन तत्त्वज्ञानाशी असलेली प्रगाढ मैत्री तिची झळाळी आणखीच खुलवून जाते. सुरेश मथुरे, विजय पाडळकर अशा अभ्यासकांनी हायकूवर भरभरून लिहिलंही आहे. मराठीतील आद्य हायकूकार शिरीष पै यांनीही त्यांच्या हायकू संग्रहांच्या प्रस्तावनांमधून आणि वेळोवेळी इतरही ठिकाणी लिहिले आहे. मराठी वाचकांना हायकू परिचित करून देतानाच, इतक्या विशुद्ध अनुभूतीला शब्दबद्ध करताना काय काळजी घ्यायची तेही हायकू आणि हायकू सदृश रचना यातील फरक दाखवून देत सांगितलं आहे. ते मुळातूनच वाचण्यासारखं आहे. त्यांच्या दोन हायकू इथे स्पष्टीकरणादाखल देण्याचा मोह आवरत नाही.

'पोपटी पालवी पाहताना<br>
भरून आले डोळे<br>
तिचे थोडे दिवस उरले'

ही एक, आणि

'उडत जाताना बगळ्यानं<br>
किंचितसा स्पर्श केला पाण्याला<br>
उठलेला तरंग वाढतच गेला'

शांताबाई शेळक्यांनीही काही उत्तम हायकू लिहिले, पण त्यात त्या रमल्या नाहीत हेच खरं.

हायकू चांगली व्हायची असेल तर तिला झेन विचारप्रणाली, तटस्थता अशा काही अवघड गोष्टींची साथ गरजेची असल्यानेच की काय, 'चारोळ्या'वाले बहुप्रसवी शब्दडोंबारी 'हायकू'च्या नादाला लागले नाहीत, हे एक सुचिन्हच!

असो. नव्या शतकाचीही १७ वर्षे उलटली आहेत. खानदेश, मराठवाडा, विदर्भ या भागांमधले अनेक प्रतिभासंपन्न, नव्या जमान्यातले कवी केवळ चांगल्या प्रकाशन-वितरण व्यवस्थेअभावी वाचलेच न गेले असण्याचा धोका सदर विवेचनालाही लागू आहे. त्यांच्यात कुठेतरी

निसर्गभान ताजं करणारी नवी कोरी कविता लिहिली गेली असेल या आशावादावर काव्य प्रांतावरील

विवेचन पूर्ण करूया.

तत्कालीन / सार्वकालिक सामाजिक वास्तवाची, विज्ञानाची निसर्ग-पर्यावरण संदर्भांशी नाळ जुळवणारं, विश्लेषणात्मक, संदर्भमूल्ये असणारं असं साहित्य मात्र मराठीत भरपूर संख्येनं आणि गुणवत्तेनं उपलब्ध आहे. शास्त्रीय लेखन करून भाषेचं हेही अंग समृद्ध करून गेलेले अनेक लेखक आहेत.

यात १९५० नंतर पहिलं नाव आठवतं ते म.वि.आपटे यांचं (पक्षीशास्त्र व अन्य पुस्तके). गेल्या शतकातील महाराष्ट्रातील ह्या परंपरेचे सशक्त पाईक म्हणजे इरावती कर्वे, दुर्गा भागवत, रमेश देसाई, प्रकाश गोळे, सुरेशचंद्र वारघडे ही सगळी नावं. रूढार्थाने साहित्य म्हणता येत नसले तरी सदाशिव सावंत यांच्या 'महाराष्ट्रातील दिव्य वनौषधी ' या पुस्तकाचा उल्लेखही अनिवार्य. आजूबाजूच्या सुमारे ३५७ वनस्पतींचे औषधी गुण, आकृत्या, शास्त्रीय माहिती असा भरगच्च मजकूर असणारा हा ग्रंथ १९७४ साली प्रथम प्रकाशित झालेला दिसतो.

१९८० च्या दशकात मराठी भाषेतला एक भव्य, आरभाट प्रयोग प्रत्यक्षात आला. तो म्हणजे 'आपली सृष्टी आपले धन' या मराठीतल्या पहिल्या रंगीत छपाई असलेल्या डबल क्राऊन आकारातील निसर्गकोशांचे ४ भाग पूर्ण होऊन प्रकाशित झाले. मोठी स्वप्नं पाहून ती प्रत्यक्षात उतरवायला आवडणारे विवेक परांजपे त्याचे मुख्य छायाचित्रकार आणि संपादक होते. दुसरे संपादक व लेखक मिलिंद वाटवे यांनी या कोशाच्या निमित्ताने मराठी निसर्ग विज्ञानाला कित्येक शास्त्रीय शब्द मराठीत इतके सोपे करून दिले की गांभीर्याने निसर्गविषयक लेखन करणारे लेखक ते आता सहजी वापरतात. त्या काळी मुद्रणकला आपल्याकडे इतकी पुढे गेलेली नव्हती, तर या मंडळींनी थेट सिंगापूर गाठून या कोशांची चार रंगी निर्मिती तिकडून आर्ट पेपरवर करून आणली. चौथ्या खंडाला पु.ल. देशपांडे यांनी मदत केल्याचं स्मरतं. या कोशाचा प्रस्तावित पाचवा भाग मात्र विवेकच्या अचानक जाण्यामुळे, इतर अडचणी आल्याने प्रकाशित होऊ शकला नाही ही कायमस्वरूपी रुखरुख राहील. आता हे कोश, खंड महादुर्मीळ गणले जातात. कालानुरूप भर घालून कुणी समर्थ हात ते पुन्हा प्रकाशित करतील इतकी आशा आता काय ती बाळगता येईल.

मारुती चितमपल्ली हेही या काळात सक्रिय लेखन करत होते. पण 'फोकलोअर'वर प्रचंड भर, मिथकं, निसर्गविषयक अंधश्रद्धांना लिखाणात दिलेले अतिरिक्त महत्त्व असे काही ठळक दोष त्यांच्या लेखनाचे संदर्भमूल्य कमी करून जातात. अर्थात पक्षीशास्त्र कोश इत्यादी त्यांच्या कामाची दाखल घेतलीच पाहिजे.

याच आसपास (१९८५?) जगदीश गोडबोले यांचं चिपको, पश्चिम घाट इत्यादी समस्यांवरील लेखन येऊ लागलं होतं. मराठी पर्यावरण पत्रकारिता मूळ धरू लागली होती.

१९९० नंतर ही वाहती परंपरा आणखी जोमाने पुढे गेली. यात मिलिंद वाटवे (आरण्यक), दिलीप कुलकर्णी (निसर्गायण), प्रकाश गोळे सातत्याने लिहीत होतेच-त्यांची अनेक पुस्तकं. असं करता करता नवीन शतक उजाडलं.

मुख्य माध्यमांमध्ये मर्यादित जागा मिळत असल्यामुळे की काय, नव्या शतकात मराठीत निसर्ग-पर्यावरण विषयांचे अनेक अभ्यासक आपापल्या विषयांवर कसदार रीतीने लेखन करू लागले. 'जंगलची वाट' हे आनंद मसलेकर या वन-अधिकाऱ्याचं आत्मचरित्र (२००१), कृष्णमेघ कुंटे- 'एका रानवेड्याची शोधयात्रा' (२००२), 'सखा नागझिरा'-लेखक-अभ्यासू पक्षीतज्ज्ञ किरण पुरंदरे (२००४), 'लहरी हवा'-अभिजित घोरपडे (२००६), 'अरण्यरुदन' -संतोष शिंत्रे (२००९) अशा आपापल्या विषयातील अभ्यासाला अनुलक्षून लिहिलेल्या पुस्तकांची उत्तम भर मराठी निसर्गसाहित्यात पडत गेली. दिलीप कुलकर्णी, प्रकाश गोळे हे याही दशकात कार्यरत होतेच. दिलीप कुलकर्णी यांची वैचारिक मांडणी इतकी सुस्पष्ट आहे की प्रस्तुत लेखकाने त्यावर एक वेगळा लेख लिहिला आहे. पर्यावरणविषयक मराठी साहित्यातील समाजशास्त्राचा अभ्यास त्यांच्या लेखनाकडे लक्ष दिल्याशिवाय अत्यंत अपुरा राहील.

अनिल अवचट यांनाही गेल्या दशकातच पर्यावरण प्रश्नांच्या गांभीर्याचा अचानक साक्षात्कार होऊन ते एकाएकी त्यांच्या आत्ममग्न 'रिपोर्ताज्' शैलीने सदर प्रश्नांवर लिहू लागले. लेखनाच्या जवळजवळ तीस किंवा अधिक वर्षांमध्ये याआधी त्यांना यातले काहीच 'प्रश्न आणि प्रश्न' कधीच कसे काय दिसले नाहीत, हे आश्चर्य. पण ही चळवळच अशी आहे की हा जगन्नाथाचा रथ ओढायला हात कुणाचे का मिळेनात... अर्थात त्यांच्या चाहत्या, 'पॅसिव्ह' वाचकवर्गाचे 'प्रोफाईल' जवळून तपासले, तर त्यांचे लेखन वाचून न कोणी आपली जीवनशैली बदलेल ना कोणी शासनाला, व्यवस्थांना थेट प्रश्न विचारेल. त्यामुळे त्यांचं चालू दे. त्या लेखनाची परिणामकारकता तपासण्याची गरज नाही.

परिणामकारकता हाच मुद्दा तपासायचा झाला तर एक अगदी विरुद्ध टोकाचं उदाहरण राजीव साने यांच्या लेखनाचं पाहता येईल. प्रचलित पर्यावरण चळवळीविषयी साने आणि त्यांच्या पिढीतले अनेक अर्थशास्त्रज्ञ, विचारवंत यांचं फारसं चांगलं मत नाही. वेळोवेळी त्यांच्या लेखनातून ते डोकावत असतंच. याचे मूळ कारण बहुधा, मूळ प्रश्न नक्की समजण्यासाठीचे या लोकांचे 'दुसऱ्या बाजूचे' वाचन पुरेसे होत नसावे असा आपला माझा एक अंदाज आहे. आत्ता मुद्दा तो नाही. साने यांची टीका वाचली की, त्यातून पर्यावरणीय भाबडेपणापासून कसं वाचता येईल, आपण आपल्या लेखनात काटेकोर शास्त्रीय तथ्ये सांगताना काय पथ्ये पाळावीत, अशा

अनुक्रमणिका

अनेक गोष्टी आपण त्यांचा मुद्दा एखादेवेळी न पटता सुद्धा त्यातून घेऊ शकतो. त्यांच्या अशा धारणा का होतात त्याचा अंदाज बांधू शकतो. पर्यावरणीय संवादशास्त्रात पर्यावरण विरोधी संवाद हाही एक महत्त्वाचा संवाद प्रकार मानला आहेच, श्री दत्ताचे चोवीस गुरू, दुसरं काय?

आणि जाता जाता एक गंमत नोंदवण्यासारखी आहे. ज्याप्रमाणे 'कोसला' आणि 'स्वामी' या दोन विरुद्ध टोकाच्या कादंबऱ्या एकाच प्रकाशनगृहातून एकाच वर्षी (१९६३) काही महिन्यांच्याच फरकाने बाहेर आल्या, तद्वतच दिलीप कुलकर्णी आणि राजीव साने या दोन टोकांच्या भूमिका असणाऱ्या लेखकांचं बहुतांश लेखन प्रकाशित करणारं प्रकाशनही एकच आहे. ते ठीक.

पण चालू दशक हे याबावतीत एकूणात निसर्ग-पर्यावरण विषयक लेखनाबावत मराठीसाठी चांगलंच म्हटलं पाहिजे. मृणालिनी वनारसे यांचे 'आपली भूमी आणि आपण', हे, 'लँडस्केप इकॉलॉजी' या विषयाची तोंडओळख करून देणारं मराठीतील पहिलंच पुस्तक, संतोष शिंत्रे लिखित 'विज्ञानाधारित निसर्गसंवर्धन' हे कॉंझर्व्हेशन बायॉलॉजी या शास्त्राची मराठीत प्रथमच ओळख करून देणारं पुस्तक, पर्यावरणाचे सांस्कृतिक, सामाजिक पदर शोधणाऱ्या वर्षा गजेन्द्रगडकर यांची 'स्त्री आणि पर्यावरण' आणि अन्य काही पुस्तके, प्रदीपकुमार माने यांचं मुंग्यांच्या अद्भुत विश्वाची शास्त्रीय सफर घडवणारं 'मुंगी -एक अद्भुत विश्व', आदिवासींच्या जीवनसंघर्षाचे पदर दाखवणारं मिलिंद थत्ते यांचं 'रानबखर', नागझिरा भागात केलेल्या कामाचा, कष्टांचा गोषवारा समर्थपणे मांडून त्यातून काही उत्तरं शोधू पाहणारं किरण पुरंदरे यांचं 'दटा हंकाट', मूळ निसर्गप्रेरणेतून उमटलेल्या कथांचा संतोष शिंत्रे लिखित कथासंग्रह 'गुलाबी सिर-अर्थात पिंक हेडेड डक', अशी अनेक अर्थगर्भ पुस्तकं चालू दशकात आली, येत आहेत. अतुल देऊळगावकर हेही या क्षेत्रातले एक अभ्यासू लेखक-कार्यकर्ते.

'मनाचे श्लोक'च्या धर्तीवर केलेले 'वनाचे श्लोक' हा तरुण लेखक हर्ष परचुरे यांचा आगळावेगळा प्रयोग. कडक मात्राबंधन असलेल्या भुजंगप्रयात वृत्तात श्लोकरूपाने सृष्टिविज्ञानाची मूलतत्त्वे सोप्या भाषेत समजावून सांगणारा, त्या त्या श्लोकांचे अर्थ गद्यातही समजावून देणारा असा हा एक महत्त्वाचा प्रयोग आहे.

विदर्भातील घनदाट वने, व्याघ्रप्रदेश, जंगलं यांच्या संरक्षण संवर्धनाला वाहून घेतलेले अमरावतीचे श्री. किशोर रिठे हे आठवणारं आणखी एक नाव. त्यांची 'रानावनाचे मूड्स' (२०१५) आणि 'हिरवा संघर्ष' (२०१७) ही दोन पुस्तकं महाराष्ट्राच्या वनाच्छादित प्रदेशांमधला संघर्ष अत्यंत रोखठोक पद्धतीने वाचकांपर्यंत पोहोचवतात. या बाबतीतील त्यांची विषयांची निवड, मांडणी आणि शैली, ही संतोष शिंत्रे यांच्या आर्थिक, सामाजिक, राजकीय गुंतागुंत सांगू पाहणाऱ्या धडक शैलीशी थेट नाते सांगणारी आहे.

असे अनेक प्रयोग, नव्या वाटा मराठीतील निसर्ग-पर्यावरणविषयक लेखनात आता घडू लागले आहेत, याबद्दलचं समाधान नोंदवून पुढील विवेचनाकडे वळू. कारण ते अधिक गरजेचं आणि तातडीचं आहे.

या सर्वच लेखकांच्या सर्वच ससंदर्भ, वैचारिक लेखनाचं प्रयोजन निव्वळ दोन घटका करमणूक करणे हे खासच नव्हतं, नाही. पर्यावरणीय संवादशास्त्र ही आता आंतरराष्ट्रीय पातळीवर मान्यता पावलेली एक ज्ञानशाखा आहे. त्यात लेखाच्या सुरुवातीला म्हटल्याप्रमाणे 'ऱ्हेटॉरिक' हा या शाखेतला एक महत्त्वाचा संवादप्रकार आहे. कारण अशा प्रकारच्या संवादामुळे एक जनमानस (public sphere), एक प्रभावक्षेत्र, जनतेला चर्चा आणि त्याद्वारे एखाद्या घटनेविषयी, प्रक्रियेविषयी आपलं मत तपासून पाहता येऊन, गरज पडल्यास त्यात आवश्यक ते बदल करून आपल्या किंवा आपल्या शासनव्यवस्थांच्या वर्तनात इष्ट बदल घडवता यावा यासाठी त्याचा उपयोग होतो. उदाहरणार्थ, रॅचेल कार्सनच्या लाखांनी खपलेल्या ज्या 'सायलेंट स्प्रिंग' पुस्तकामुळे पहिला पर्यावरणविषयक कायदा अमेरिकेच्या सिनेटमध्ये मंजूर झाला, त्यात मांडलेली तथ्ये ही आधी विविध शास्त्रज्ञांच्या परिषदांमधून मांडली गेलीच होती. रॅचेलच्या पुस्तकांनी ती सत्य तथ्ये लाखो लोकांपर्यंत पोहोचवली, तेव्हा सरकारवर दबाव येऊन त्यांना कायदे करणं भाग पडलं.'

मराठीबाबतच बोलायचं झालं, तर मराठीत इतकं प्रभावी 'ऱ्हेटॉरिक', उत्तम सालंकृत भाषेत मांडणारे लेखक असताना, ना लोकांच्या वर्तनात हवे ते बदल घडून मोठ्या प्रमाणात नागरिक पर्यावरणस्नेही बनतायत, ना शासनव्यवस्थांची विनाशकारी धोरणं बदलून ती पर्यावरणकेंद्री होतायत. अपेक्षेपेक्षा फार कमी बदल ह्या सर्व लेखनाचा परिणाम म्हणून दिसतो आहे. जनमानस, लोक या लिखाणाकडे काहीसं अलिप्तपणे, काहीशा अपराधीपणे आणि बऱ्याचशा निष्क्रियपणे पाहतायत. या लेखनातून त्यांना व्यवस्थांना जाब विचारण्याची, प्रचलित विकासनीतीपुढे प्रश्न उभे करण्याची ताकद ते मिळवत नाहीयेत. आणि ह्यात लेखकांची काही चूक नाही. सार्वत्रिक बधिरीकरण आणि निसर्गनिरक्षरता, रोजच्या जीवनसंघर्षात अडकवून अशा गोष्टींवर विचार करायला वावच न ठेवणे, आदी हुकमी तंत्रे वापरून हितसंबंधीय शासन-व्यवस्था, यंत्रणा यांनी चलाखपणे त्यांची चाल खेळली आहेच. उद्याच्या पर्यावरण साहित्याच्या समाजशास्त्रीय अभ्यासात वर्तमानाची नोंद प्रभावहीन पर्यावरणीय साहित्य असण्याचा काळ अशी होऊ नये.

वाट आपण सर्वांनीच काढायची आहे. अशी काही वाट निघाली तरच मराठीत लेखन करून विविध प्रकारे आपलं निसर्गभान ज्या विविध लेखकांनी आपापल्या साहित्यप्रकारांतून गेली दोन शतकं जागृत ठेवलं त्यांच्या, आणि या विवेचनामागील प्रस्तुत लेखकाच्या प्रयत्नांचं सार्थक झालं असं म्हणता येईल.

●

लेख

हेमकिरण पत्की

# साठोत्तरी मराठी कादंबऱ्यांचा पर्यावरणीय जाणिवेतून घेतलेला मर्मग्राही मागोवा

■ ■

**हे पुस्तक म्हणजे एका संवेदनशील माणसातल्या लेखकाने पर्यावरणाचा, साठोत्तरी कालखंडातील पर्यावरणाचा अकादेमीच्या चौकटीत केलेला अभ्यास आहे.**
**डॉ. सुहास पुजारी हे खरे निसर्गप्रेमी आहेत. यामुळेच या ग्रंथाला एक आत्मीय परिमाण सहजच लाभले आहे. या ग्रंथाचे लेखन निसर्गप्रेमातून झाले आहे, हा या ग्रंथाचा विशेष आहे. ग्रंथातल्या पर्यावरणविषयक प्रश्नाची व्याप्ती ही केवळ ग्रांथिक नाही तर ती मनुष्यमात्राच्या जीवनाशी थेट जोडलेली आहे, हे लेखक जाणून आहे. हे असे सर्वांगांनी जाणल्यामुळेच 'मराठी-कादंबरी : सृष्टी आणि दृष्टी' या ग्रंथानी शास्त्रीय परिभाषेतली मांडणी संवेद्य झाली आहे.**

■ ■



साहित्य आणि पर्यावरण यांतलं नातं आपण जाणतोच. साहित्यिकाचं पहिलं प्रकटीकरण जेव्हा झालं, तेव्हापासून हे नातं विकसित होत आलं आहे. एखाद्या लेखक-कवीच्या विकसनासाठीसुद्धा स्वाभाविक पर्यावरणाची आवश्यकता असते. म्हणूनच वाङ्मय आणि पर्यावरण यांच्यातील स्वाभाविक नातेसंबंधाचा शोध घेणं उद्‌बोधक ठरतं. मानवाचं विकसन जसं होत आहे, तसं त्यांच्यातील हे पर्यावरणाविषयीचं भान अधिकाधिक सूक्ष्म होत आहे. आणि मनुष्यमात्राची ही पर्यावरणविषयक जाणीव व्यामिश्र होत चाललेली आपण पाहू शकतो. प्रगतशील तंत्रज्ञानाच्या ह्या काळात शेतीचे होत चाललेले व्यवसायीकरण, खेडोपाडी पोहोचणारी औद्योगिक क्रांती, लोकसंख्येची प्रचंड वाढ आणि त्यामुळे होत जाणारा निसर्गसंपत्तीचा क्षय या सर्वच कारणांनी पर्यावरणाचे संतुलन विघडत चालले आहे. आणि म्हणूनच आधुनिक युगात पर्यावरण हा एक जागतिक स्तरावरचा अत्यंत महत्त्वाचा प्रश्न बनला आहे. या सर्व पार्श्वभूमीवर पर्यावरणाच्या प्रश्नाला केंद्रस्थानी ठेवून नव्या जाणिवेनं त्याचा विचार करण्याची, सामाजिक प्रबोधन करण्याची आवश्यकता निर्माण झाली आहे.

डॉ. सुहास पुजारी यांचा 'मराठी कादंबरी : सृष्टी आणि दृष्टी' हा ग्रंथ या कळीच्या प्रश्नाविषयी आपलं नवं वैचारिक चिंतन वाचकांसमोर ठेवतो. ह्या ग्रंथाच्या प्रकाशनाची यथार्थता प्रत्येक संवेदनशील वाचकासाठी म्हणूनच तीव्रतेने जाणवत राहते.

दुसऱ्या महायुद्धानंतर विज्ञान आणि तंत्रज्ञानाच्या क्षेत्रात मानवाने झपाट्याने प्रगती केली. त्याचे काही चांगले आणि वाईट परिणाम माणसाच्या आणि इतर जिवांच्या जीवनावर झाले. अणुविस्फोट, किरणोत्सार यांचे दुष्परिणाम आपण सारेजण पाहतो आहोत. प्रचंड प्रमाणात निर्माण झालेल्या वायुप्रदूषणाने पर्यावरणाचा तोल ढासळलेला आपण अनुभवतो आहोत. तंत्रज्ञानाच्या प्रगतीमुळे औद्योगिकीकरण वाढले. उदरनिर्वाहाच्या गरजेपोटी खेड्यातील माणूस शहराकडे ओढला जाऊ लागला. आणि साहजिकच खेडी ओसाड पडू लागली. शहरे प्रदूषणाने व झोपडपट्ट्यांनी वेढली गेली. मानवाच्या जीवनात तंत्रज्ञानाने प्रवेश केल्यापासून आपण पाहतो आहोत की पाखरं देशांतराला गेली. धरणं-बंधारे बांधल्यानं नद्यांची थारोळी झालीत. वायुप्रदूषणाने झाडांचे, प्राण्यांचे आणि कृमिकीटकांचे वंश नष्ट होत आहेत. प्रचंड लोकसंख्या वाढीतून शहरात माणसांना राहायला जागा नसल्याने डोंगर-टेकड्या भुईसपाट झाल्यात. समुद्रकिनाऱ्यांवरतो



अनुक्रमणिका

माणसांनी अतिक्रमण करून निसर्गावर ताबा मिळविला आहे. आणि यामुळे समुद्राच्या किनारपट्ट्या संकोचून गेल्यात. जिथं तिथं माणसांची स्वार्थप्रेरित बुद्धी बोकाळली आहे.

या साऱ्या पर्यावरणाच्या असमतोलाच्या झळा संवेदनशील माणसांना सोसाव्या लागत आहेत. वरचेवर त्याचे पर्यावरणविषयक भान तीव्र होत जाताना विनोबांच्या विधानाचे स्मरण व्हावे. ते म्हणत, 'बुद्धीचा सर्वांत मोठा पराभव तिचा स्वार्थासाठी उपयोग होणे हा होय.' याची प्रचिती आपण घेत आहोत.

अशा या पार्श्वभूमीवर डॉ. सुहास पुजारींच्या पर्यावरणविषयीच्या नव्या जाणिवेचं जागरण घडवणारं पुस्तक प्रकाशित होतं आहे, ही एक समाजातील शुभ घटना आहे. हे पुस्तक म्हणजे एका संवेदनशील माणसातल्या लेखकाने पर्यावरणाचा, साठोत्तरी कालखंडातील पर्यावरणाचा अकादेमीच्या चौकटीत केलेला अभ्यास आहे. त्याचे महत्त्व केवळ ग्रंथप्रकाशनापुरते नाही. अभ्यासाची उपयोजित बाजू त्याला अवश्य आहे. तरीदेखील एवढीच ग्रांथिक नोंद घेऊन आपल्याला थांबता येणार नाही. डॉ. सुहास पुजारी हे खरे निसर्गप्रेमी आहेत. यामुळेच या ग्रंथाला एक आत्मीय परिमाण सहजच लाभले आहे. या ग्रंथाचे लेखन निसर्गप्रेमातून झाले आहे, हा या ग्रंथाचा विशेष आहे. ग्रंथातल्या पर्यावरणविषयक प्रश्नाची व्याप्ती ही केवळ ग्रांथिक नाही तर ती मनुष्यमात्राच्या जीवनाशी थेट जोडलेली आहे, हे लेखक जाणून आहे. हे असे सर्वांगांनी जाणल्यामुळेच 'मराठी-कादंबरी : सृष्टी आणि दृष्टी' या ग्रंथानी शास्त्रीय परिभाषेतली मांडणी संवेद्य झाली आहे.

अनुक्रमणिकेतली प्रकरणाची केवळ शीर्षकं पाहा. त्यातलं लेखकाचं पर्यावरणविषयक प्रश्नांचं भान किती व्यापक आहे ते आपल्याला दिसून येईल.

१. पर्यावरण : स्वरूप आणि समस्या

२. पर्यावरणीय भान : पूर्वाभास

३. साठोत्तरी मराठी कादंबरीतील पर्यावरणीय अनुभवाचे स्वरूप

४. साठोत्तरी कादंबरीतील पर्यावरणीय भान आविष्काराचे स्वरूप

साहित्य, प्रसारमाध्यमे, सामाजिक व पर्यावरणाशी निगडित संस्था आणि शासन अशा सर्वच स्तरांवरून सुरू झालेल्या 'पर्यावरणीय प्रबोधन युगाची' साठोत्तरी मराठी कादंबरीतून संवेदनशील नोंद कशी घेतली गेली आहे, ते डॉ. सुहास पुजारींनी सविस्तर तपशिलांसह नोंदवले आहे. ते म्हणतात, 'साहित्यातून पर्यावरणीय प्रबोधनाचे भान प्रकट झाले आहे. तसे समाजाच्या स्तरावरही प्रत्यक्ष कृती व चळवळींच्या स्वरूपातूनही हे भान व्यक्त झाले आहे. पक्षिनिरीक्षण, निसर्गनिरीक्षण, अरण्यनिरीक्षण, गिरिभ्रमण, गिर्यारोहण, दुर्गभ्रमण, जलविहार, जलपर्यटने, नदी, खाड्या व समुद्रसफरी, आकाशनिरीक्षण, तारकादर्शन, नक्षत्रावलोकन, ग्रहणदर्शन, शासन व विविध पर्यावरणप्रेमी संघटना, संस्था यांचे उपक्रम व सर्व प्रसारमाध्यमांकडून होणारे पर्यावरणीय प्रबोधन, वॉल्ट डिस्ने यांचे व्यंगचित्रपट, शिक्षणक्रमात झालेला पर्यावरणशास्त्राचा समावेश, विविध पर्यावरणविषयक चळवळी यांमधूनही पर्यावरणीय प्रबोधनाची जाणीव-ज्योत प्रज्वलित राहिली आहे. त्यातून समाजात पर्यावरणविषयक वास्तव व व्यापक जाणीव उदयास आली. ही जाणीव स्वातंत्र्यपूर्वकाळातील साहित्यातून व्यक्त होणाऱ्या सौंदर्यवादी जाणिवेपेक्षा अधिक व्यापक आहे. ती सौंदर्यग्राही व अद्‌भुतरम्यतेच्या ओढीपुरतीच मर्यादित नसून पर्यावरण रक्षणाच्या व संवर्धनाच्या विचाराला अधिक परिपुष्ट करणारी आहे.

मोक्षगुंडम विश्वेश्वरय्या, सुंदरलाल बहुगुणा, डॉ. सलीम अली, जिम कार्बेट, के. सी. श्रॉफ, मारुती चितमपल्ली, मेधा पाटकर, विलासराव साळुंखे, भंवरलाल जैन व अण्णा हजारे यांच्यासारख्यांनी व्यक्तिगत व सामाजिक पातळीवरून पर्यावरण प्रवोधनासाठी केलेले कार्य खूप मोलाचे आहे. हे पर्यावरणीय प्रवोधन सर्व स्तरांवर व्हायला हवे. पर्यावरणातील सर्व घटकांमध्ये निसर्गतः असणारा सहसंबंध पुढे कसा नेता येईल, तो अबाधित कसा राखता येईल, हे सावधपणे पाहिले पाहिजे. साहित्य हे प्रबोधनासाठी एक प्रभावी माध्यम आहे. पर्यावरणीय संस्कार, पर्यावरणीय जाणीवजागृती याकरिता वाङ्‌मयीन प्रतिसाद फार महत्त्वाचा आहे. निसर्गाच्या भव्यतेचे, त्यातील घटकांच्या सहसंबंधाचे प्रभावी दर्शन साहित्यातून घडले पाहिजे. अशा विचारांतून डॉ. सुहास पुजारी यांनी प्रस्तुत ग्रंथाची सिद्धता केली आहे. ग्रंथलेखनामागचा हा हेतू कुठल्याही संवेदनशील वाचकाला दृष्टीआड करता येण्यासारखा नाही.

सदानंद देशमुखांचे 'बारोमास', सुरेखा शहा यांची 'जोहड' या कादंबऱ्या पर्यावरणीय भान जागवणाऱ्या प्रातिनिधिक कादंबऱ्या आहेत. वृक्षसंवर्धनाला व पर्यावरणरक्षणाला चालना देणारा 'बारोमास'मधला विचार एका निसर्गप्रेमी शेतकऱ्याचा आहे : 'ज्यांच्या दारी झाडं होती त्यांनी आर्थिक अडचणीला बळी पडून विकली. आधी शेतातली. मग दारातली. खरं म्हणजे झाडांची खरी गरज शिवारालाच. तिथल्या मातीची धूप होऊ नये म्हणून.

**प्रवीण बांदेकरांच्या 'चाळेगत' या पर्यावरणाच्या ऱ्हासाचे अस्वस्थ अवकळाचित्र रेखाटणाऱ्या कादंबरीची नोंद डॉ. पुजारींनी खूप जाणतेपणानं घेतलीय. पुजारी लिहितात, 'हत्तींचा कळप गावात घुसल्याचा एक प्रसंग 'चाळेगत'मध्ये चित्रित केला आहे. हत्ती गावात घुसतात आणि शेतकऱ्यांच्या पिकांचे मोठे नुकसान करतात. अशा तक्रारीचा सूर या चित्रणातून व्यक्त झाला आहे. तो कोकणातील कुळवाड्यांच्या रहिवाशांच्या दृष्टीने न्याय्य असेल परंतु वन्यजिवांवर अन्याय करणारा आहे. पर्यावरणीय विचारांना व एकूणच पर्यावरणीय जाणिवेला तो छेद देणारा आहे.' या मार्मिक नोंदीमुळे वाचकाचे पर्यावरणविषयक भान अधिक तीव्र व उत्कट होते.**

जमिनीचा पोत टिकून राहावा म्हणून झाडं हवीच.'

'जोहड'मधील पाणीप्रश्न व त्या अनुषंगानं उभारलेल्या एका पर्यावरणवादी विचाराच्या कार्यकर्त्याच्या लोकोत्तर कार्याची कहाणी आहे. त्या विषयीचं डॉ. पुजारींचं चिंतन मुळातून वाचण्यासारखं आहे.

प्रवीण बांदेकरांच्या 'चाळेगत' या पर्यावरणाच्या ऱ्हासाचे अस्वस्थ अवकळाचित्र रेखाटणाऱ्या कादंबरीची नोंद डॉ. पुजारींनी खूप जाणतेपणानं घेतलीय. पुजारी लिहितात, 'हत्तींचा कळप गावात घुसल्याचा एक प्रसंग 'चाळेगत'मध्ये चित्रित केला आहे. हत्ती गावात घुसतात आणि शेतकऱ्यांच्या पिकांचे मोठे नुकसान करतात. अशा तक्रारीचा सूर या चित्रणातून व्यक्त झाला आहे. तो कोकणातील कुळवाड्यांच्या, रहिवाशांच्या दृष्टीने न्याय्य असेल परंतु वन्यजिवांवर अन्याय करणारा आहे. पर्यावरणीय विचारांना व एकूणच पर्यावरणीय जाणिवेला तो छेद देणारा आहे.' या मार्मिक नोंदीमुळे वाचकाचे पर्यावरणविषयक भान अधिक तीव्र व उत्कट होते.

साठोत्तरी मराठी कादंबरीतील पर्यावरणीय अनुभव व पर्यावरणीय जाणिवेचा आविष्कार करणाऱ्या 'हिंदू : जगण्याची समृद्ध अडगळ', 'गोतवळा', 'माउली', 'झाडाझडती', 'पांगिरा', 'राघववेळ', 'मेंढका', 'अरण्यकांड', 'बारोमास', 'जोहड', 'एसईझेड', 'चक्रीवादळ', 'कापूसकाळ', 'चाळेगत' इ. कादंबऱ्यांसंबंधी पर्यावरणीय वास्तवाला कलारूप देण्यात आलेल्या प्रतिभेच्या सामर्थ्याबाबत डॉ. पुजारींनी मार्मिक भाष्य केले आहे.

डॉ. पुजारींनी या ग्रंथात नोंदवलेल्या पर्यावरणाशी जोडलेल्या संज्ञा त्यांच्या निसर्गचिंतनातून जन्मलेल्या आहेत. उदाहरणार्थ - पर्यावरणीय जाणीव/ पर्यावरणीय भान/ पर्यावरणीय वास्तव/ पर्यावरणाचे संस्कृतीकरण/ पर्यावरणीय प्रबोधनयुग/ पर्यावरणीय अनुभव/ पर्यावरणीय संवेदन/ पर्यावरणाविषयीचा प्रेमभाव/ पर्यावरणीय इतिहास. या साऱ्या संज्ञा पुजारींचे निसर्गावर नितांत प्रेम असल्याच्या द्योतक आहेत.

डॉ. पुजारींचा 'मराठी कादंवरी : सृष्टी आणि दृष्टी' हा ग्रंथ वाचल्यावर वाचकाच्या मनात पर्यावरणविषयक म्हणजेच निसर्गविषयक भावनात्मक चिंतन सुरू होतं : पर्यावरण केवळ मनुष्यमात्राचं नसून साऱ्या जीवमात्रांचं आहे. पर्यावरणीय संवेदन हे प्रादेशिक, प्रांतीय किंवा राष्ट्रीय असं नाही; पर्यावरण म्हणजे केवळ विचार नाही किंवा संकल्पना नाही जी शासकीय-प्रशासकीय पातळीवरून राववावी लागते. पर्यावरण आपल्या सर्वांच्या अस्तित्वाशी जोडलेलं आहे. कारण आपण ज्या पंचमहाभूतापासून जोडलेले आहोत ते पर्यावरणच आहे.

प्रस्तुत ग्रंथाची भावगर्भता वसंत आबाजी डहाकेंच्या एका लहानशा कवितेतून किती समर्थपणे व्यक्त झाली आहे ते आपणाला पाहता येईल.

*'झाड तोडायचे, कापायचे*
*लगदा करायचा, कागद बनवायचा,*
*त्यावर लिहायचे, ते छापायचे,*
*मग वाचायचे.*
*एवढा खटाटोप कशासाठी?*
*सरळ*
*झाडच वाचावे!*
*झाड वाचताना*
*मला तुझाही अर्थ*
*उलगडत जातो.,*

●

**हेमकिरण पत्की**
अ-४, गजानन अपार्टमेंट,
आसरा सोसायटी, होटगी रोड,
सोलापूर - ४१३००३
चलभाष : ९४०३७६८८९१



अनुक्रमणिका

समीक्षा

**प्रा.किरण गाढवे**

'साहित्यकृतीचे माध्यमांतर' हे बहुप्रतिक्षित व बहुचर्चित संपादित पुस्तक नोव्हेंबर २०१७ मध्ये प्रकाशित झाले. संस्कृती प्रकाशनाने प्रकाशित केलेले हे पुस्तक एकूण २७२ पृष्ठांचे असून एकूण सहा विभागांत विषयानुरूप विभागलेले आहे. सिनेमा व साहित्य आणि विशेषतः साहित्यकृतीच्या माध्यमांतराचा प्रवास या पुस्तकातून समोर येतो. डॉ.राजेंद्र थोरात, प्रा.आशुतोष कसबेकर यांनी या ग्रंथाचे संपादन केलेले आहे.

प्रसिद्ध सिनेदिग्दर्शक नागराज मंजुळे यांची प्रस्तावना या पुस्तकाला लाभलेली आहे. माध्यमांतर संकल्पना व स्वरूप, दूरचित्रवाणीवरील माध्यमांतर, कवितेचे माध्यमांतर, नाटकाचे माध्यमांतर, साहित्यकृतीचे माध्यमांतर, साहित्यकृतीवरील चरित्रपट असे विभाग या ग्रंथात समाविष्ट केलेले आहेत. साहित्यकृतीचे माध्यमांतर होत असताना ती साहित्यकृती कोणत्या प्रक्रियेतून जात असते, याबद्दल दिग्दर्शक नागराज मंजुळे म्हणतात, 'आशय अभिव्यक्तीच्या दृष्टीने साहित्य व सिनेमा ही दोन्ही माध्यमं मला जवळची आहेत. साहित्यकृतीचे माध्यमांतर हे ओंजळीतून पाणी घेऊन येण्याचा प्रकार असून आशयाची गळती होऊ न देण्याची मोठी जबाबदारी दिग्दर्शकाची आहे. कादंबरी, कथा, कवितेतील आशय सिनेमात माध्यमांतरित करीत असताना खूप तयारी करावी लागते. थोडे दुर्लक्ष झाले तरी आशयात मोठा बदल होतो. त्यामुळे आशयाची गळती न होण्यासाठी योग्य ती काळजी घेतली पाहिजे.' (मलपृष्ठ, साहित्यकृतीचे माध्यमांतर) एकंदरीत माध्यमांतराच्या प्रक्रियेत कोणती काळजी घ्यावी, हे वरील विधानातून लक्षात येते.

- साहित्यकृतीचे माध्यमांतर
- संपादक : डॉ. राजेंद्र थोरात, प्रा.आशुतोष कसबेकर
- संस्कृती प्रकाशन
- पृष्ठे :२७२
- मूल्य : ३००




कोणत्याही साहित्यकृतीमध्ये असणारा आशय माध्यमांतराच्या दृष्टीने महत्त्वाचा असतो. शब्दांच्या माध्यमातून लेखक घटना-प्रसंगांची निर्मिती करतो, त्यावेळी वाचकाच्या नजरेसमोर प्रसंग उभे राहत असतात. सिनेमामध्ये यांनाच महत्त्व असते. त्यामुळे कॅमेऱ्याच्या माध्यमातून तो आशय रसिकांसमोर आणण्याचे काम माध्यमांतर करत असते. कथा, कविता, नाटक, कादंबरी, चरित्र, आत्मचरित्र, आत्मकथन इ. साहित्यप्रकारांतून समाजजीवनाचे चित्रण केले जाते. साहित्यकृती कथनपर असल्यामुळे तिच्यामध्ये इतर माध्यमांमध्ये माध्यमांतरित होण्याच्या शक्यता निर्माण होतात. आकाशवाणी, सिनेमा, मालिका, माहितीपट या माध्यमातून माध्यमांतर होताना आशयाची नक्कल अभिप्रेत नसते (संपादकीय,राजेंद्र थोरात,पृ.०९). आशयाची नक्कल माध्यमांतरात आवश्यक

**कोणत्याही साहित्यकृतीमध्ये असणारा आशय माध्यमांतराच्या दृष्टीने महत्त्वाचा असतो. शब्दांच्या माध्यमातून लेखक घटना-प्रसंगांची निर्मिती करतो, त्यावेळी वाचकाच्या नजरेसमोर प्रसंग उभे राहत असतात. सिनेमामध्ये यांनाच महत्त्व असते. त्यामुळे कॅमेऱ्याच्या माध्यमातून तो आशय रसिकांसमोर आणण्याचे काम माध्यमांतर करत असते. कथा, कविता, नाटक, कादंबरी, चरित्र, आत्मचरित्र, आत्मकथन इ. साहित्यप्रकारांतून समाजजीवनाचे चित्रण केले जाते. साहित्यकृती कथनपर असल्यामुळे तिच्यामध्ये इतर माध्यमांमध्ये माध्यमांतरित होण्याच्या शक्यता निर्माण होतात.**

नसते तर जो मूळ आशय विषय आहे किंवा लेखकाला काय सांगायचे आहे, ते आशयासह माध्यमांतरित करणे आवश्यक असते. कारण माध्यमांतरात मूळ साहित्यकृतीतील भाषा नसली तरी चालते परंतु प्रसंगांची एकसलग मालिका तयार करणे आवश्यक असते. भाषेचे बंधन का नसते तर, एखाद्या साहित्यकृतीवरून मूक सिनेमाही तयार होऊ शकतो आणि चित्रांच्या माध्यमातून योग्य आशय रसिकांपर्यंत पोहोचविता येतो. अर्थात माध्यमांतरात भाषा महत्त्वाची नसते असेही नाही. कधी कधी माध्यमांतरामध्ये त्रुटी असतील तर मूळ साहित्यकृतीवर अन्याय होऊ शकतो. माध्यमांतरामध्ये या धोक्याची शक्यता नाकारू शकत नाही. साहित्यकृतींचे माध्यमांतर होते तेव्हा शब्द या द्रव्याऐवजी स्वर, धनद्रव्य, शारीरिक हालचाली, रंगरेषा किंवा दृक्श्राव्य प्रतिमा अशा गोष्टी वापरल्या जातात. यामुळे मूळ संवेद्य वैशिष्ट्यांमध्ये फरक होतो. याचबरोबर त्या-त्या माध्यमांची संरचनातंत्रे बदलतात(श्यामला वनारसे, पृ.१९) माध्यमांतर होतानाची एकंदरीत प्रक्रिया यावरून स्पष्ट होते. परंतु सर्वच साहित्यकृतींचे माध्यमांतर करता येत नाही. तशी संरचना त्या साहित्यकृतीची असावी लागते. साहित्यकृती वाचतानाच त्यात एखादे नाटक, एखादा सिनेमा डोळ्यांसमोर दिसावा लागतो. कारण दृश्यात्मकता हा माध्यमांतरामध्ये अतिशय महत्त्वाचा भाग असतो.

माध्यमांतर या संकल्पनेचा विचार, कथा, कादंबरी, कविता, नाटक यांसारख्या साहित्यप्रकाराच्या पुस्तकातून सिनेमा, मालिका, नाटके तयार करणे एवढ्यापुरता मर्यादित असून चालत नाही तर, सिनेमावरूनही पुस्तकांमध्ये माध्यमांतर होणे आवश्यक आहे. आपल्याकडे तसे होताना दिसत नाही. पुस्तकावरून सिनेमा आणि सिनेमावरून पुन्हा पुस्तक असा प्रवास अपेक्षित आहे. विविध कलाप्रकारांतील 'माध्यमांतरित' आदानप्रदान आणि त्याची प्रयोगशीलता जपणे, तिचा प्रसार करणे हे आपल्या रसिकतेचे आणि सुसंस्कृतपणाचे लक्षण असणे आवश्यक आहे(रविराज गंधे, पृ.२६). सिनेमांवरूनही पुस्तकनिर्मिती होणे आवश्यकच आहे. कारण अभिरुचिभिन्नता हा मनुष्याचा गुणधर्म आहे. सर्वांनाच सिनेमा पाहायला आवडेल असे नाही किंवा सर्वांनाच पुस्तके वाचायला आवडतील असेही नाही. त्यामुळे माध्यमांतराद्वारे रसिकांची अभिरुची लक्षात घेऊन माध्यमांतराचा, पुस्तक ते सिनेमा आणि सिनेमा ते पुस्तक असा प्रवास व्हायला हवा.

माध्यमांतराचे अनेक फायदे आहेत. एखाद्या साहित्यकृतीच्या पुनःप्रत्ययाचा आनंद, दुर्लक्षित परंतु महत्त्वाची साहित्यकृती उजेडात येते, माध्यमांतराद्वारे एखाद्या साहित्यकृतीचा समाजातील अशिक्षित वर्गालाही आस्वाद घेता येऊ शकतो असे अनेक फायदे सांगता येतील. 'आमच्या आयुष्यातील काही आठवणी' या रमाबाई रानडे यांच्या आत्मकथनावर आधारित 'उंच माझा झोका' मालिका सादर केली गेली. यासंदर्भातील शुभश्री काळे यांचे मत लक्षात घेतले तर माध्यमांतराचे काय फायदे आहेत हे समजू शकेल. त्या म्हणतात, ही मालिका सुरू झाली आणि वाचकांकडून 'आमच्या आयुष्यातील काही आठवणी' या आत्मकथनाला मागणी वाढली. १९१०साली प्रकाशित झालेले हे आत्मकथन ग्रंथजगतात दुर्मीळ होते. त्यामुळे प्रकाशकांनी त्याची नवीन आवृत्ती काढून प्रसिद्ध केली. हा व्यवहार आर्थिक लाभ देऊनही गेला. पण त्या निमित्ताने वाचकांना इतकी जुनी साहित्यकृती मुळात वाचावी ही जिज्ञासा जागृत झाली. हा महत्त्वाचा ऐतिहासिक, सामाजिक दस्तऐवज वाचावा हे कुतूहल निर्माण झाले. हा माध्यमांतराचा फायदा झाला (शुभश्री काळे, पृ.७९,८०). यावरून माध्यमांतराचे फायदे

## साहित्यकृतीच्या माध्यमांतराच्या अभ्यासाची पायवाट तयार करणारा महत्त्वाचा संदर्भ ग्रंथ

लक्षात येतात व दुर्लक्षित साहित्य कशा प्रकारे प्रकाशात येते हे लक्षात येते. कविता या वाङ्मयप्रकाराचा माध्यमांतराच्या दृष्टीने विचार करता येईल. मराठीतील अनेक कवितांपासून गीते तयार झालेली आहेत. उदा. कुणाच्या खांद्यावर कुणाचे ओझे, मी रात टाकली-मी कात टाकली इत्यादी. त्याचबरोबर संतांचे अभंग, शाहिरांचे पोवाडे, गवळणी यालाही माध्यमांतरेच म्हणता येईल. कारण हे कवितेचेच वेगवेगळे प्रकार आहेत. मुळात कवितेचे गीतात माध्यमांतर होण्यासाठी त्या कवितेत गेयता, लय असणे आवश्यक असते. सर्वच कवितांची गीते होऊ शकत नाहीत. बहिणाबाई चौधरींच्या कवितांमध्ये ही गेयता, लय मूलतःच आहे त्यामुळे त्यांच्या अनेक कवितांची गीते झाली. अर्थात कवितांचे फक्त गीतच होऊ शकते असेही नाही, तर कविता अनेक माध्यमांमध्ये माध्यमांतरित होऊ शकते. प्रसिद्ध कवी संदीप खरे म्हणतात, 'कविता या माध्यमामध्ये अनेक शक्यता असतात. कवितेचे चित्र होणे, गीत होणे, नाटक होणे, शिल्प होणे किंवा संपूर्ण सिनेमा तयार होणे या विविध माध्यमांतराच्या शक्यता आहेत. विविध माध्यमांमध्ये माध्यमांतरित होणे हे कविता या साहित्यप्रकाराचे सामर्थ्य आहे' (संदीप खरे, पृ.८५). यावरून कविता कोणकोणत्या माध्यमांमध्ये माध्यमांतरित होऊ शकते हे लक्षात येते. चित्र, गीत, नाटक, शिल्प, सिनेमा ही ती माध्यमे सांगता येतात. मराठी सिनेमा किंवा हिंदी सिनेमामधील अनेक गीते कवितांवरूनच माध्यमांतरित होऊन तयार झालेली आहेत. माध्यमांतराद्वारे पुस्तकांमध्ये अडकलेल्या कवितांचा श्वास मोकळा होतो असेही म्हणता येते. मराठीतील अनेक महत्त्वाच्या कविता माध्यमांतरामुळे अशिक्षित वर्गापर्यंत पोहोचलेल्या आहेत. हे माध्यमांतराचे बलस्थान आहे असे म्हणावे लागेल.

मराठीमध्ये अनेक नाटकांचीही माध्यमांतरे झालेली आहेत. विजय तेंडुलकर, वि.वा.शिरवाडकर, वसंत कानेटकर अशा अनेक नाटककारांची नावे सांगता येतील. नाटक हे प्रत्यक्ष घडत असते त्यामुळे त्याचे माध्यमांतर करत असताना बरेच बदल अपेक्षित असतात. 'नटसम्राट' नाटकाचे सिनेमामध्ये झालेले माध्यमांतर पाहिले असता कोणते बदल अपेक्षित असतात हे लक्षात येतील. अर्थात नटसम्राट हे नाटकाच्या माध्यमांतराचे उत्तम उदाहरण आहे असे नाही. त्याचबरोबर अनेक कादंबऱ्यांचे सिनेमामध्ये माध्यमांतर झालेले आहे. 'साहित्यकृतीचे माध्यमांतर' या पुस्तकातील अनेक लेखांचा यासंदर्भात विचार केला तर कादंबरी ते सिनेमाचा प्रवास कसा असतो हे लक्षात येते. मराठीतील 'नटरंग', 'सिंहासन', 'दुनियादारी', 'शाळा', 'जोगवा', 'बनगरवाडी', '७२ मैल' अशा अनेक कादंबऱ्यांवरील सिनेमांच्या माध्यमांतराचा विचार प्रस्तुत पुस्तकात केलेला आहे. चरित्र-आत्मचरित्र या प्रकारातील साहित्यकृतीचे सिनेमामध्ये माध्यमांतर करीत असताना चरित्र-आत्मचरित्राच्या नायकाच्या आयुष्यातील महत्त्वाचे घटना-प्रसंग निवडावे लागतात आणि आयुष्याचा सलग पट उभा राहणे आवश्यक असते, परंतु मालिकेमध्ये माध्यमांतर करीत असताना विस्तृत चरित्र उभा करता येऊ शकते. साधारणतः कोणत्याही साहित्यकृतीचे माध्यमांतर करण्यासाठी त्यामध्ये तसा आशय असणे आवश्यक असते.घटना-प्रसंगही आवश्यकच असतात.मराठीतील अनेक आत्मचरित्रांचे सिनेमामध्ये माध्यमांतर झालेले आहे. उदा. 'प्रकाशवाटा', 'मी वनवासी', 'कृष्णाकाठ' इत्यादी.

एकंदरीत 'साहित्यकृतीचे माध्यमांतर' या पुस्तकातून अशा विविध वाङ्मयप्रकारांतील साहित्यकृतींचे माध्यमांतर कसे करता येते, माध्यमांतरातील फायदे-तोटे, त्रुटी शोधण्याचा प्रयत्न केलेला आहे. अनेक दर्जेदार लेख जसे या पुस्तकात आहेत तसेच माध्यमांतराच्या अनुषंगाने विविध मतमतांतरे व्यक्त करणारे लेखही आहेत. अर्थात सर्वच मते बरोबर आहेत असे म्हणता येत नाहीत. त्यामध्ये वैविध्य जाणवते. माध्यमांतर ही संकल्पना अतिशय योग्य पद्धतीने डॉ. राजेंद्र थोरात यांनी या पुस्तकातून मांडण्याचा प्रयत्न केलेला आहे. माध्यमांतरांच्या अभ्यासकांसाठी उपयुक्त असणारा हा संदर्भ ग्रंथ मराठी समीक्षेत भर घालणारा आहे असेच म्हणावे लागते. डॉ. थोरात यांच्या या ग्रंथातून माध्यमांतर या संकल्पनेबद्दल वाचकास उपयुक्त माहिती मिळेल यात शंका नाही. पुढील काळात मराठी विषयाच्या अभ्यासक्रमाच्या दृष्टीने या ग्रंथाचे मोल अत्यंत महत्त्वाचे आहे. सिनेक्षेत्रात काम करणाऱ्यांसाठी हा ग्रंथ मार्गदर्शक ठरेल. कारण, साहित्यकृती ते सिनेमा ही प्रवासप्रक्रिया कशी घडते हे या ग्रंथात समाविष्ट असणाऱ्या वेगवेगळ्या लेखांच्या माध्यमातून समजते. मराठीमध्ये साहित्यकृतीचे माध्यमांतर या विषयाच्या अनुषंगाने मार्गदर्शक ठरतील असे फार ग्रंथ उपलब्ध नाहीत. ह्या ग्रंथाच्या प्रकाशनाने ही पोकळी काही प्रमाणात भरून निघेल अशी आशा वाटते. ज्येष्ठ दिग्दर्शक जब्बार पटेल यांचे कार्य लक्षात घेऊन हा ग्रंथ त्यांना सन्मानपूर्वक अर्पण केला आहे. साहित्यकृतीच्या माध्यमांतराच्या अभ्यासाची पायवाट निर्माण करण्याचे कार्य या ग्रंथाने केले आहे.

●

समीक्षा

भास्कर ढोके

# शून्य एक मी
# चिंतनगर्भ कविता

**'शून्य एक मी' या कवितासंग्रहातून कवीच्या विचारप्रक्रियेतील सातत्य जाणवते. या कवितेचे भावविश्व परंपरा आणि आधुनिकता यांच्या संधिकालातील आहे. ९०नंतर वेगाने होत जाणारे बदल, तंत्रज्ञानाने चकवलेली आधुनिकता, आंतरजालाने सपाट करून टाकलेले जग आणि त्यातून अतिक्रमित झालेला अतिरेकी व्यक्तिवाद, व्यवहारवाद आणि त्यातून उद्‌भवलेली अभूतपूर्व परिस्थिती हा या कवीच्या चिंतेचा आणि चिंतनाचा विषय आहे. आधुनिकीकरणाच्या एका टप्प्यावर यंत्र बनविणारे यंत्र निर्माण होऊन मानवी श्रमाचे मूल्य अचानक घटल्याने जी परिस्थिती निर्माण झाली होती, तशीच काहीशी आताची स्थिती आहे. तेच भांबावलेपण आजही दिसते आहे. यंत्राच्या आक्रमणाची नेमकी जाणीव ज्याप्रमाणे मर्ढेकरांच्या कवितेतून मराठी काव्यविश्वाला झाली होती, तेच मूल्यभान पी. विठ्ठलच्या कवितेतून दिसते.**

'शून्य एक मी' हा पी. विठ्ठल यांचा दुसरा कवितासंग्रह. मुद्रण सुलभतेने किंवा इतर कारणाने मराठी भाषेत कवितासंग्रहांचे मुबलक पीक आले आहे. या कविता अत्यंत आक्रस्ताळी, आवाजी, पसरट, सपाट किंवा केवळ काव्यात्म विधान करणा-या आहेत. दुसऱ्या बाजूला एकसुरी, व्यासपीठ गाजवणारी आणि स्वतःच्याच प्रेमात पडलेली कविता मोठ्या प्रमाणात दिसते आहे. या पार्श्वभूमीवर जे काही काव्यलेखन गंभीरपणे होताना दिसते आहे, त्यात पी.विठ्ठल यांच्या कवितांचा उल्लेख करावा लागतो. कविता हा काही केवळ शब्दांचा खेळ नसतो. गंभीर कविता नेहमीच चिंतनाच्या पातळीवर जाते. एक विचारव्यूह मांडत असते. पी. विठ्ठल यांच्या कवितांमधून या अपेक्षा बहुतांशी पूर्ण होतात. 'शून्य एक मी' या कवितासंग्रहातून कवीच्या विचारप्रक्रियेतील सातत्य जाणवते. या कवितेचे भावविश्व परंपरा आणि आधुनिकता यांच्या संधिकालातील आहे. ९०नंतर वेगाने होत जाणारे बदल, तंत्रज्ञानाने चकवलेली आधुनिकता, आंतरजालाने सपाट करून टाकलेले जग आणि त्यातून अतिक्रमित झालेला अतिरेकी व्यक्तिवाद, व्यवहारवाद आणि त्यातून उद्‌भवलेली अभूतपूर्व परिस्थिती हा या कवीच्या चिंतेचा आणि चिंतनाचा विषय आहे. आधुनिकीकरणाच्या एका टप्प्यावर यंत्र बनविणारे यंत्र निर्माण होऊन मानवी श्रमाचे मूल्य अचानक घटल्याने जी परिस्थिती निर्माण झाली होती, तशीच काहीशी आताची स्थिती आहे, तेच भांबावलेपण आजही दिसते आहे. यंत्राच्या आक्रमणाची नेमकी जाणीव ज्याप्रमाणे मर्ढेकरांच्या कवितेतून मराठी काव्यविश्वाला झाली होती, तेच मूल्यभान पी. विठ्ठलच्या कवितेतून दिसते. महानगरीय जीवनाच्या अपरिहार्यतेचे वर्णन करताना मर्ढेकरांनी-

*'मी एक मुंगी, हा एक मुंगी*
*तो एक मुंगी, तू एक मुंगी,...*
*-आला आला स्वस्त दारावर आला हो आला*
*हा मुंग्यांचा लोंढा आला! खोला फाटक खोला!-*
*दहा दहाची लोकल गाडी*
*सोडीत आली पोकळ श्वास:*
*घड्याळाच्या काट्याचा अन्*
*सौदा पटला दीनउदास*

या कवितेतून मुंबई शहरातील एक विशिष्ट वास्तव मांडले आहे. मानवी जीवनाची होणारी घुसमट अर्थातच त्यांना अमानवी वाटते. ही मूल्यहीनता एका

रूपक प्रक्रियेतून कवितारूप घेते. मर्ढेकरांचा हा जीवनानुभव व्यक्तिगत असूनही तो कवितेत मूल्यानुभवाच्या पातळीवर जातो आणि म्हणूनच तो व्यक्तिगत न राहता समष्टीचा होतो. व्यक्तिगत अनुभवाला कवितारूपातून सार्वत्रिक करण्याची क्षमता हेच चांगल्या कवितेचे महत्त्वाचे लक्षण असते. अलीकडे अशी अनुभूती देणारी कविता अभावानेच आढळते. पी. विठ्ठलची कविताही मर्ढेकरांप्रमाणेच एक सार्वत्रिक चिंतनाची अनुभूती देते. उदा. 'आणि ह्या मुंग्या तर...' ही कविता

*एक मुंगी*
*दोन मुंग्या*
*तीन चार पाच*
*खूप खूप*
*खूप म्हणजे खूप मुंग्या*
*प्रश्नांच्या मुंग्या*
*प्रदेशाच्या मुंग्या*
*राजकीय, सामाजिक, सांस्कृतिक मुंग्या*
*मॉलच्या मुंग्या, बॉलच्या मुंग्या*
*अध्यात्माच्या मुंग्या, अत्याचाराच्या मुंग्या*
*पार्लर, सेक्स आणि दहशतीच्या मुंग्या*
*रिझर्वेशनच्या मुंग्या*
*रिॲलिटी शोच्या मुंग्या*
*गावातल्या, महानगरातल्या गर्भपाताच्या मुंग्या*

(पृ.१८,१९)

या कवितेतून समकालीन वास्तवासंबंधीच्या भावनिक प्रतिक्रिया व्यक्त होतात. मर्ढेकरांच्या कवितेतील मुंगी मानवी जीवनाच्या क्षुद्रतेचा निर्देश करते तर पी. विठ्ठलची मुंगी नैतिक, अनैतिक आणि नैतिकतेच्या सीमारेषा पुसट करणाऱ्या आधुनिक मूल्यभावाचा निर्देश करते. डिजिटल जगात आपल्या हातात काहीच राहिले नसल्याची, एक शून्य झाल्याची हतबलता, आपले आदर्श आणि नैतिकतेच्या संकल्पना कुचकामी ठरत असल्याची प्रबळ जाणीव पुढील ओळीतून प्रकर्षाने व्यक्त होते-

*माझ्या आत्मसन्मानावर निवांत पहुडल्यात मुंग्या*
*आदर्शवादाच्या गीझर्सने मी तापवून ठेवलेय पाणी*
*पण धाडस होत नाहीय ते अंगावर घेण्याचं*
*होरपळून जाईल वाटतं एखादी मुंगी*
*मुंगी माझ्या संवेदनेला चिकटून बसलीय*
*आणि वारूळ होऊन मी सांभाळतोय*
*या समस्येच्या मुंग्यांना*. (पृ.१९)

इथे कवी आत्मसन्मान, आदर्शवाद, संवेदना इ.मानवी मूल्यव्यवस्थेसंबधी काही सांगू इच्छितो; पण या सगळ्यांवर मात करणाऱ्या, संवेदना बधिर करणाऱ्या आणि हव्या नकोच्या सीमारेषेवर असणाऱ्या मुंग्यांना सोडूही इच्छित नाही, अशी रूपकात्मक मांडणी करतो. या कवितेतून आधुनिक जगात माणसाच्या वर्तनाचे एक रूप निर्देशित करण्याचा प्रयत्न करतो. जे प्रत्यक्षात परिस्थितीच्या गुलामीत आहे, पण ही गुलामी आहे याची मात्र त्याला जाणीव नाही.

मुळात पी. विठ्ठलच्या कवितेकडे चिंतनगर्भ कविता म्हणूनच बघावे लागते कारण त्यांच्या कवितेतून वास्तवासंबंधीचे सूक्ष्म चिंतन आणि वास्तवांच्या निमित्ताने काहीएक मूल्यविचार व्यक्त होताना दिसतो. कवी अत्यंत ठामपणे वैचारिक विधान करतांना दिसतो. त्यातून त्याची जीवनविषयक दृष्टी आणि चिंतनाची खोली ध्यानात येते. एखाद्या कवीच्या समग्र कवितेचा विचार करताना, काव्य समजून घेताना कवी काय सांगतो, वास्तवाकडे, जीवनाकडे कोणत्या दृष्टीने पाहतो, कवितेतून प्रत्यक्ष अप्रत्यक्ष कोणते विचार प्रकट करतो, याच्या समग्र आकलनातून त्याचे जीवनविषयक तत्त्वज्ञान शोधण्याचा आपण प्रयत्न करत असतो. चिंतनशील कवितेतून कवी विविध प्रकारची विधाने करीत असतो. या विधानांमधून तो आपला सभोवताल, त्याचे वास्तव आणि त्या वास्तवाचे कलात्मक रूप प्रकट करीत असतो. आजच्या वेगाने बदलणाऱ्या युगाचे अत्यंत प्रत्ययकारी रूप पी. विठ्ठलने आपल्या कवितेतून मांडले आहे. माणसाच्या जगण्याच्या प्रक्रियेत, त्याच्या विचार आणि आचार-प्रक्रियेत होणारा बदल, एका जीवनमूल्याकडून दुसऱ्या उसन्या जीवनमूल्याकडे होणारा प्रवास आणि त्यातून येणारा चंगळवाद, अस्तित्व, मूल्यव्यवस्थेविषयीची संवेदनहीनता समकाळात इतक्या प्रभावीपणे क्वचितच कुणा कवीला मांडता आली आहे. त्याला हे वास्तव प्रभावीपणे मांडता आले आहे. पी.विठ्ठलच्या कवितेचे हे बलस्थान आहे.

### धुरी, गुर्जर परंपरा आणि पी. विठ्ठल-

६०च्या दशकात मुंबईसारख्या महानगरामध्ये फोफावलेला बकालपणा, तरुणांमध्ये आलेली वैफल्यग्रस्तता वसंत दत्तात्रय गुर्जर यांनी काव्यात्मकतेला नाकारत; सरळ विधानात्मक रचनेतून आणि उपरोधात्मक भाषेतून, जीवनातील असफलता, रसहीनता आपल्या गद्यकाव्यातून प्रभावीपणे मांडली होती. भाषेच्या पातळीवरही अनेक प्रयोग करीत जगण्याची अपरिहार्यता, हलाखी, रटाळपण आणि क्षुद्रत्व कमालीच्या तटस्थतेने



अनुक्रमणिका



> “ मुळात पी. विठ्ठलच्या कवितेकडे चिंतनगर्भ कविता म्हणूनच बघावे लागते कारण त्यांच्या कवितेतून वास्तवासंबंधीचे सूक्ष्म चिंतन आणि वास्तवाच्या निमित्ताने काहीएक मूल्यविचार व्यक्त होताना दिसतो. कवी अत्यंत ठामपणे वैचारिक विधान करतांना दिसतो. त्यातून त्याची जीवनविषयक दृष्टी आणि चिंतनाची खोली ध्यानात येते. एखाद्या कवीच्या समग्र कवितेचा विचार करतांना, काव्य समजून घेतांना कवी काय सांगतो, वास्तवाकडे, जीवनाकडे कोणत्या दृष्टीने पाहतो, कवितेतून प्रत्यक्ष अप्रत्यक्ष कोणते विचार प्रकट करतो याच्या समग्र आकलनातून त्याचे जीवनविषयक तत्त्वज्ञान शोधण्याचा आपण प्रयत्न करत असतो. चिंतनशील कवितेतून कवी विविध प्रकारची विधाने करीत असतो. या विधानांमधून तो आपला सभोवताल, त्याचे वास्तव आणि त्या वास्तवाचे कलात्मक रूप प्रकट करीत असतो. आजच्या वेगाने बदलणाऱ्या युगाचे अत्यंत प्रत्ययकारी रूप पी. विठ्ठलने आपल्या कवितेतून मांडले आहे. ”

आणि परिणामकारकतेने मांडले होते. त्यातून गुर्जरांची एक शैलीच प्रस्थापित झाली होती. पी. विठ्ठलची कविता वसंत दत्तात्रय गुर्जर आणि गुरुनाथ धुरी यांच्याशी नातं सांगणारी आहे. या कवितेत धुरी यांची कथात्मकता नसली तरीही मानवाची पराधीनता, जगण्याविषयीच्या गंभीर जीवनजाणिवा, असुरक्षितता, एकटेपणा आणि तुटलेपण धुरींप्रमाणेच याही कवितेत दिसते आणि म्हणूनच ही कविता त्या परंपरेचे पुढचे पाऊल आहे, असे म्हणता येते.

६०-७०च्या दशकातील धुरी आणि गुर्जरांच्या कवितेतील संचित घेऊन पी. विठ्ठलची कविता नवआधुनिकीकरणाचा वेध घेते. खरे तर आधुनिकीकरणाची प्रक्रिया ही अत्यंत गुंतागुंतीची आहे. ही प्रक्रिया एका सरळ रेषेत घडणारी नाही, मांडता येणारीही नाही. मुळात आपण भारतीय लोक आधुनिक आहोत का? कुठल्या अर्थाने आधुनिक आहोत? ही आधुनिकता आपल्यावर लादलेली आहे का? असे अनेक प्रश्न आहेत आणि त्याची उत्तरे सरधोपटपणे देता येत नाहीत. खरेतर आधुनिकीकरणाची प्रक्रिया पूर्ण होण्याआधीच किंवा ती कळण्यापूर्वीच नवआधुनिकीकरणाच्या लाटा येऊन धडकल्या. औद्योगिकीकरणापेक्षा माहिती-तंत्रज्ञान आणि त्याचा विश्वबाजारासाठी केला जाणारा धडाकेबाज उपयोग सामान्य माणसाच्या आकलनापलीकडचा आहे. आतापर्यंत आपण वस्तूंचा बाजार पाहत होतो, आता माणसाचेच वस्तूंमध्ये रूपांतर झाले आहे. मानवी शरीर ही एक वस्तू आहे आणि ती उपभोग्य वस्तू आहे, तिचे एक बाजारमूल्य आहे. हा वस्तूकरणाचा वेग इतका प्रचंड आहे की, सामान्य माणूस एकतर भांबावून गेला आहे किंवा परिस्थितीला शरण तरी गेला आहे. औद्योगिकीकरणाने निर्माण केलेल्या मध्यमवर्गाचे नवमध्यमवर्गात रूपांतर झाले आहे. आधुनिक जीवनशैली आणि चंगळवादाने त्याला भ्रमित केले आहे, एका अर्थाने तो गांजेकस झाला आहे. ही सुस्ती त्याच्या सगळ्या अस्तित्वाला व्यापून राहिली आहे. महत्त्वाचे म्हणजे त्याला ही सुषुप्तीची अवस्था वाटते आहे. त्याच्या मूल्यव्यवस्थेमध्ये आता पूर्वीच्या नीती आणि नियमांना स्थान नाही. आता आस्था आणि श्रद्धांच्या जागा बदलल्या आहेत. क्रयमूल्य असणाऱ्या गोष्टीच महत्त्वाच्या ठरत आहेत. माणसाच्या अभिरुची बाजाराच्या गरजेप्रमाणे घडवणे हे बाजाराचे उद्दिष्ट आहे. त्यासाठी त्याच्या संवेदना बधिर करून त्याच्या विचार करण्याची क्षमता शबलीत करणे हेच भांडवली बाजाराचे यश आहे. ही अवस्था पी. विठ्ठलने बरोबर पकडली आहे. तो म्हणतो-

*अभिरुचीचे केंद्र हलले आहे आपले*
*गोपनीय गोष्टींनाही प्रतिष्ठा मिळत गेली हळूहळू*
*आणि शोकेसमध्ये कधी येऊन उभी राहिली*
*न्यूड बाहुली*
*कळूच दिलं नाही माझ्या एकरेषीय जगण्यानं*
*हुसेनची चित्र अचानक मौल्यवान बनून गेली*
*माझ्या कलाविष्काराच्या गॅलरीत*
*आणि कबीर तुकारामावर साचत चाललीय धूळ*
(पृ.१२)

या विश्वबाजारामध्ये एकदा शरीर ही वस्तू ठरल्यावर तिचे बाजारमूल्य जपण्याची, वाढवण्याची अपरिहार्यताही येतेच. त्यातूनच मग शरीरकेंद्री सौंदर्यवृद्धी महत्त्वाची ठरते.

*आपण आपले सांभाळून ठेवू सारे अवयव*
*ब्युटीपार्लरमध्ये चोळून घेऊ वय वाढत चाललेली*
*निस्तेज त्वचा*



अनुक्रमणिका

*डोळे, नाक, कान, नख, बोट, दात, ओठ घासून*
*पुसून येऊ चकचकीत होऊ* (पृ.१३)

कबीर आणि तुकारामाचा आत्मा आणि आतल्या आवाजापेक्षा हुसेनच्या चित्रातील नग्नता, शरीर सुंदर दिसण्यामागील लैंगिक उत्तेजनांची प्रेरणा मानवी समूहाच्या भोगवादी वृत्तीकडे निर्देश करते. या चकचकीत दृश्यवादी जगात एकीकडे वाहिन्यांवर साजरे होणारे, चघळले जाणारे निरर्थक विषय, त्यात रस घेणारे लोक; संचारक्रांतीने दिवाणखाण्यात आलेले आभासी जग आणि दुसऱ्या बाजूला हरवलेले आप्तस्वकीयांचे, आत्मीयतेचे जग याच्यातील द्वंद्व पाहायला मिळते. म्हणजे आभासी जगातील कुणीतरी नटी मेल्याची बातमी टी.आर.पी. वाढवण्यासाठी दिवसभर चघळली जाते. आपण ती बातमी घरातीलच कुणीतरी गेल्यासारखी पाहतो आणि स्वत:ची मावशी मेल्याचे मात्र दोन वर्षांनी कळते. याचाच अर्थ आभासी नात्यांना महत्त्व प्राप्त होतेय आणि खरी नाती आभासी, बिनमहत्त्वाची किंवा कालबाह्य ठरताहेत. आपण सपाटीकरणाच्या प्रक्रियेत संदर्भहीन झाले आहोत. हे संदर्भहीन होणं कवीला मोठं क्लेशदायक वाटतं. आपल्या आयुष्यावर आपलाच काही अधिकार असू नये किंवा तुमचे जगणेच अदखलपात्र असावे अशा शून्य माणसांचे या व्यवस्थेत काय स्थान आहे?

*बलात्कारातूनच व्हावा एखाद्याचा जन्म आणि*
*सांगता येऊ नये आपल्या बापाचे नाव*
*इतके बेवारस जगणं वाट्याला आलेल्यांनी*
*काय करावं?*

असा प्रश्न उपस्थित करतो. मुळात जगणेच संदर्भहीन झालेल्या माणसाने काय करावे? त्याचे या विश्वाच्या भांडवली पसाऱ्यात स्थान काय? किंवा तत्त्वज्ञानात उपस्थित केला जाणारा आध्यात्मिक प्रश्नच दुसऱ्या मार्गाने उपस्थित होतो की, मुळात जगण्याचे, जन्माला येण्याचे प्रयोजनच काय? एका भांडवली व्यवस्थेने लादलेली व्यवस्था आहे. आपलं नातं सांगावं असं या व्यवस्थेत काहीच नाही; ही पूर्णपणे अतिक्रमित व्यवस्था असल्याने ती परकी आहे आणि म्हणून तिच्याशी काही भावनिक नातंही प्रस्थापित होत नाही. म्हणून कवी आपल्या अस्तित्वाची मुळं परंपरेत शोधण्याचा प्रयत्न करतो.

या प्रश्नाची उत्तरे जेथे शोधावी, ते अध्यात्माचे क्षेत्रही बाजाराच्याच प्रभावाखाली असल्याने कवीचा अपेक्षाभंग होतो. नेणिवेत दडी मारून बसलेला तुकोबाचा अभंग या बाजारू अध्यात्माच्या भाऊगर्दीत शोधण्याचा प्रयत्नही निष्फळ ठरत असल्याची खंत व्यक्त होते.-

*आणि मी तर वाजवत सुटलोय*
*निरामय भक्तीची व्याधिग्रस्त टाळ*
*ईश्वराची कोणतीच हाक*
*पोहोचली नाही अजून तरी माझ्यापर्यंत...*

या सगळ्या जगड्व्याळ पसाऱ्यात, सर्वत्र पसरलेल्या या भावनांच्या बाजारात तुकोबाच्या अभंगाचा त्याला आधार वाटतो. अध्यात्मातून बाबा,. बापूंच्या बाजारूपणातून भ्रमनिरास होऊनही त्याला कुठून तरी कारुण्याची ओल आपल्यापर्यंत येण्याची आशा वाटते. आणि ही अपेक्षा पूर्ण होण्याची कुठलीही शक्यता दृष्टिक्षेपात नसल्याने, कबीर-तुकारामाच्या काव्यातील करुणाही कुठेच दिसत नसल्याने, एकूणच संतत्वाचा अभाव असल्याने; मानवी कल्याणासाठी किंवा केवळ माणूस म्हणून जगण्यासाठीची ऊर्जा कुठून मिळेल? या प्रश्नांची उत्तरे नकारात्मक असल्याने नैराश्य व्यक्त होते.

*मला विद्वेषाचा धूर नष्ट करता येईल काय?*
*मनाच्या वाळवंटावर सत्याचं पीक घेता येईल काय?*
*विखाराचा विंचू ठेचता येईल काय?*
*पण अशी तर कुठलीच शक्यता दिसत नाहीय*
*अजून तरी-*

या जागतिकीकरणाच्या प्रक्रियेतून उद्‌भवलेल्या अतिरेकी व्यक्तिवादाला केवळ वारकऱ्यांच्याच मार्गाने उत्तर देता येऊ शकते. व्यक्तिवादाला समष्टीच्या कल्याणाचा विचारच ठाम पर्याय होऊ शकतो; पण संतत्वाच्या अभावी ती शक्यताही धूसर होताना दिसते आणि म्हणूनच एक नैराश्य दाटून येते. पण या नैराश्यातून कुठेही आक्रस्ताळेपणा किंवा कुणातरी अनामिक शत्रूला जबाबदार ठरवून केली जाणारी आगपाखड दिसत नाही. अनेकदा कवितेतला 'मी' अहमच्या पातळीवर जाताना दिसतो. अनेक कवी स्वत:च्या दु:खाचे उदात्तीकरण करतात. दु:खाचे आणि भोगण्याचेही अहंकारात रूपांतर होताना दिसते. पण पी. विठ्ठल त्याला अपवाद आहे. तो आत्मपरीक्षण करतो, प्रसंगी स्वत:लाही आरोपीच्या पिंजऱ्यात उभा करताना दिसतो. त्याच्या कवितेतला 'मी' कधीही आणि कुठेही अहंकाराच्या पातळीवर जात नाही. त्याच्या कवितेतला 'मी' केवळ कवीचा आतला आवाज न राहता तो समष्टीचा आवाज होतो. हातातून सटकत गेलेल्या परिस्थितीला तो स्वत:लाही जबाबदार धरतो. विविध आधुनिक साधनांनी, भौतिक सुखांनी भरलेल्या चकचकीत

घरात जेव्हा कळकटलेला बाप येतो, तेव्हा त्याला हा सगळा चकचकाट केविलवाणा वाटतो -

*कधीतरी येतो घरी काठी टेकवत*
*चप्पा सावरत, कळकट-मळकट*
*धोतरातला रापलेल्या चेहऱ्याचा बाप...*
*बापाची आश्वासक नजर फिरते घरभर*
*आणि भव्य वगैरे असणारे घर*
*केविलवाणं दिसू लागतं*
*घरासारखं बापाला सजवता येत नाही*
*बाप घरापेक्षाही थोर असतो. (पृ.३६)*

बाप, आजी, आजोबा, तुकाराम, कबीर, विठ्ठल, दिंडीचे, नदीचे, जेजुरी, खंडोबा, विधिनाट्य, लोकपरंपरांचे संदर्भ, या कवितांमधून सतत येतात तेच मुळात कवीची परंपरेशी, कृषिव्यवस्थेशी असणारी नाळ अजूनही तुटलेली नाही म्हणूनच. या भोगवादी जगामध्ये आजी-आजोबांच्या संस्कारांची उणीव त्याला जाणवते, त्यांचे निर्व्याज प्रेम, आपुलकी, ममत्व कुठेतरी लुप्त झाल्याची खंत तो व्यक्त करतो -

*कोवळ्या वयातल्या आठवणींचा सुटलेला पदर*
*पुन्हा घेता येईल काय डोक्यावर*
*या प्रचंड ग्लोबल महाजालात?*
*मी शोधतोय मुलांचे हरवलेले आजी आजोबा*
*पाळण्यातल्या पायावर अलगद ठेवला जाणारा*
*काजळाचा नितळ ठिपका*
*दृष्ट लागू नये म्हणून जपणारं गणगोत (पृ.७०)*

ही केवळ आजी-आजोबा हरवल्याची खंत नाहीये तर संस्कार, सत्य आणि नीतीचे तत्त्वज्ञानच हरवल्याची खंत आहे. 'नदीच्या नि:स्तब्ध व्याकूळ पाण्यावर' (पृ.२६,२७) या कवितेतही तो नदीमध्ये संस्कृतीचा झरा शोधतो, नदी त्याला आदिम रूपात दिसते ती मानवतेचे, माणसाच्या सुखदु:खाचे लौकिक पारलौकिकतेचे सोहळे अंगावर झेलणारी म्हणून मातृसमान वाटते, पण याच नद्यांचे आपण गटारात रूपांतर करून तिचं जिवंतपण, प्रवाहीपण कुंठीत केल्याची खंत व्यक्त करतो. नदीचे प्रवाह त्याला शतकानुशतके माणसाचा इतिहास घेऊन वाहत आहे असे वाटते. तिचा प्रवाह अडणे म्हणजे माणूसपणाचा अंतच. माणूस मुळात आपले माणूसपणच हरवून बसलाय. त्याचं प्रत्यक्षात व्यावहारिक माकड झालं आहे. व्यावहारिक जगाच्या प्रचंड प्रपाती वेगाने त्याचा संयम संपलाय. त्यामुळे त्याचा सगळा व्यवहार श्रद्धाहीन उपचार झालेला आहे, जगणं गुळगुळीत झालं आहे-

*तर झालयं नेमकं काय की आपण आता*
*थांबू शकत नाही कुणासाठी अजिबात*
*बघू शकत वाट कुणाचीही अगदी देवाचीसुद्धा*
*सदिच्छेच्या एसएमएसला सेम टू यू किंवा*
*थँक्यू म्हणावं*
*इतक्या कृत्रिमपणे तर घडत असतो आपला*
*देवधर्माशी व्यवहार (पृ.८४)*

श्रद्धा आणि आस्था लोप पावल्याने जग ढोंगी झालंय. कोण पुरोगामी आणि कोण प्रतिगामी, तेच कळेनासं झालंय, मुळात 'प्रतिगामी चेह-यावर पुरोगामित्वाची सर्जरी' (पृ.८४) केलेली आहे असंच त्याला वाटतं. तो धार्मिक कर्मकांड आणि ढोंगी पुरोगामित्व या दोघांचाही निषेधच करतो. म्हणून हा कवी नैतिकतेच्या एका उच्च पातळीवरील समाजाचे सूचन करतो किंवहुना अपेक्षा करतो. तो म्हणतो -

*भयाच्या पांघरुणात सुटतोच डोक्याला घाम*
*तिथी, वार, नक्षत्रांचा चोळला जातो बाम*
*अमावस्या, पौर्णिमा, सूर्योदय, सूर्यास्त*
*पंचांगाच्या पाटाखाली तेच ते जुने जुने*
*कुणीच विचारत नाही कुठे निघून गेले*
*जगण्याचे सुंदर गाणे! (पृ.८५)*

जगण्याचे सुंदर गाणे हरवल्याची खंत आणि त्याची कारणमीमांसा हे या कवितांचे महत्त्वाचे वैशिष्ट्य आहे. आज पी.विठ्ठलची कविता ही चिंतनगर्भ, मूल्यात्मक विचार मांडणारी कविता आहे पण म्हणून ती केवळ गद्य विधाने करत नाही. कवितेतील मूल्यभाव प्रतिमात्म किंवा रूपकात्म असतो; तो सर्वसामान्य अनुभवाला रूपकप्रक्रियेने विशिष्ट व सार्वत्रिक बनवतो. कवितेचा विचार करताना कवीच्या विशिष्टतेच्या पलीकडे जाऊन ती कविता सार्वत्रिक अनुभवाच्या पातळीवर सिद्ध होणे अत्यंत महत्त्वाचे असते, अशी कविता काळाच्या कसोटीवरही मोठी ठरते. पी. विठ्ठलच्या कवितेतील मूल्यभाव, चिंतन, प्रतिमा, रूपक यांच्यामध्ये संघटन आहे. म्हणूनच ही कविता केवळ वैचारिक अनुभव देत नाही तर समग्र काव्यात्म अनुभव देते. ती आपल्या सभोवताली दिसणाऱ्या दैनंदिन व्यवहार आणि घटनांना रूपकप्रक्रियेतून काव्यात्म रूप देते. आपण आपल्या समोवताली कितीतरी घडामोडी सतत पाहत असतो. उदा. नद्यांच्या झालेल्या गटारी, प्रदूषण, टी. व्ही. चॅनेलवरचा जाहिरातींचा मारा, ब्रँडेड वस्तूंचे फॅड, मुलामुलींचे बदलत जाणारे जीवनमान, शहरी जीवनाचे वाटणारे आकर्षण, कृषिव्यवस्थेपासून दूर पळणारे तरुण, नव्या व्यवस्थेत कालबाह्य होत चाललेला बाप. या कवितांमधून रूपकात्म प्रकटतात. उदा.-

*पण हळूहळू मीही बनत चाललोय ब्रँडेड माणूस*



अनुक्रमणिका

*चप्पल, बूट, शर्ट, पँट, परफ्युम्स, पेन, गॉगल्स,*
*मोबाईल, कंडोम, कम्प्युटर,*
*जगण्याच्या कक्षेतल्या सगळ्याच वस्तू*
*माझ्यासकट होत गेल्या ब्रँडेड; पण मूठभर मातीत*
*ढीगभर सुख पेरणारा बाप अजून कसा नाही*
*झाला ब्रँडेड* (पृ.५२)

किंवा

*लोक म्हणतात कवीला कळतात माणसं. डोंबल!*
*अडतीस वर्षांत काय बघितले? बघितला गाव-*
*तांडा, वाडी-वस्ती, नगर-महानगर, गुरं-ढोरं,*
*झाडं-झुडपं,*
*राजदूत जावा होंडा-फेरी घरदार*
*देव्जात्र-शाळा कॉलेज*
*माणसं सतर. सभा संमेलनं हॉटेल-लॉज. समुद्राच्या*
*वाळूतही लोळून पाहिले, धर्म पाहिला,*
*दंगल पाहिली,*
*ललर-बापूंची प्रवचने ऐकली.*
*हवे नको ते वाचून झाले.*
*गाथासप्तशती ते आषाढमाती.*
*माणसाच्या हजार जाती.* (पृ.८३)

या आणि अशा सर्वच कवितांमधून कवीची जीवनदृष्टी, चौफेर निरीक्षण, काव्यात्म अनुभवाला भिडण्याची क्षमता दिसते. जीवनातील विरोधाभास टिपते, संवेदनशीलतेने मांडते. नकारात्मक, स्वकेंद्री, व्यावहारिक जगाचे चित्र मांडतानाही ही कविता निराशावाद पेरत नाही तर एक आशेचा किरण दाखवते, मानवी संवेदना जागृत ठेवण्याचे सूचन करते. 'आपण एखादी कविता लिहूया' या कवितेत कवी म्हणतो,

*कविता माणसांच्या स्वप्नात खोल दडलेली असते*
*आपण आपल्या तळाशी थोडं डोकावून बघू या*
*आपण एखादी कविता लिहूया!* (पृ.५४)

●

**भास्कर ढोके**
चलभाष : ९४२३०८१०४६





अनुक्रमणिका

लेख

डॉ. छाया महाजन

# अनुवाद
## गरज, समस्या आणि उपाय

■ ■

**भवतालाविषयी माणूस सतत उत्सुक असतो. तर इतरेजन कसे राहतात, कसे कपडे घालतात, कशावर विश्वास ठेवतात. सांस्कृतिक दृष्ट्या किती प्रगत आहेत, भौतिक दृष्ट्या किती उंची गाठलीये, हेही जाणण्याची गरज वाटते. (मी 'द मेमोरेबल स्टोन' ही मल्याळम भाषेतील कादंबरी अनुवादित केली. वास्तविक ही स्वदेशीची होती. फक्त परप्रांतीय केरळची होती इतकंच. पण निसर्ग वेगळा, रोजचे जगणे वेगळे. जमीनदारी- त्यातही मुस्लीम धर्मियांची आणि कुटुंब व्यवस्थाही निराळी होती.**

■ ■

अनुवादाची गरज का, ह्या प्रश्नाचं एक सुंदर उत्तर रवींद्रनाथ टागोरांच्या 'द रीलेशन ऑफ द इंडिज्युअल टू द युनिव्हर्स'मध्ये मिळतं. ते म्हणतात, 'Man must realise the wholeness of his existence, his place in the infinite; he must know that hard as he may strive he can never create his honey within the cells of his hive, for the perennial supply of his life food is outside their walls.'

मनुष्याला (आपल्या अस्तित्वाच्या अखंडतेचा साक्षात्कार झाला पाहिजे) अनंत विश्वातील आपले स्थान जाणवले पाहिजे. त्याला समजले पाहिजे की आपण कितीही धडपड केली तरी आपल्या पोळ्यातल्या (मधुकोशाच्या) अगदी छोट्या पेशीसारख्या जागेत आपल्याला मध किती निर्माण करता येईल? आपल्याला आयुष्य भरभरून जगण्यासाठीचा जीवनरस या पोळ्याच्या बाहेरच मिळेल.

अनुवाद हा त्या जीवनरसासारखा आहे. तो बाहेरून मिळवावा लागतो.

यासाठी माणसाला काही उपजत प्रवृत्ती उपयोगी पडतात. रोजच्या आयुष्यात आपल्याला शेजारी डोकावण्याची इच्छा असते. भवताली काय चाललंय याची उत्सुकता असते. अर्थात, असे न केल्याने काही बिघडत नाही, पण केल्याने माहिती मिळते- ही उत्सुकताच अनुवादासाठी कारणीभूत आहे.

त्यामुळेच परप्रांतीय किंवा परकीय संस्कृतीविषयीची माहिती महत्त्वाची वाटते, जाणून घेण्याची इच्छा होते. स्टाइनर म्हणतो, 'दुसऱ्याला समजून घेण्याची मानवी वृत्ती ही भाषांतर प्रवृत्ती असून तीमुळे परकीयांचे आचार, विचार, पर्यावरण म्हणजे डोंगर भागात राहणारे, अती थंड प्रदेशात राहणारे, वाळवंटात राहणारे, त्यानुसार रोजचे जगणे, प्रथा, परंपरा याविषयी माहिती मिळते. भवतालाविषयी माणूस सतत उत्सुक असतो. तर इतरेजन कसे राहतात, कसे कपडे घालतात, कशावर विश्वास ठेवतात. सांस्कृतिक दृष्ट्या किती प्रगत आहेत, भौतिक दृष्ट्या किती उंची गाठलीये, हेही जाणण्याची गरज वाटते. (मी 'द मेमोरेबल स्टोन' ही मल्याळम भाषेतील कादंबरी अनुवादित केली. वास्तविक ही स्वदेशीची होती. फक्त परप्रांतीय केरळची होती इतकंच. पण निसर्ग वेगळा, रोजचे जगणे वेगळे. जमीनदारी- त्यातही



अनुक्रमणिका

मुस्लीम धर्मियांची आणि कुटुंब व्यवस्थाही निराळी होती. श्रीमंतांनी इतरांच्या बायकांना सहजपणे वापरणे, त्यांनीही ते मान्य करणे हे आश्चर्यकारक होते. तसा गरोदर बाईच्या पोटाला धागा बांधण्याची प्रथाही. महाराष्ट्रात मुस्लिम समाजात ही प्रथा आहे का, याचा मी शोध घेतला, तेव्हा तशी प्रथा नाही हे कळलं. तुलनात्मक विचार अनुवादात निश्चित येतात.

शिवाय सध्याचा काळ हा माहितीच्या महापुराचा आहे. संगणकावर गुगलसारखे ॲप हा दरवाजा आहे. उघडायचाच अवकाश आहे. व्हॉट्सॲप, ट्विटर कितीतरी मार्ग आहेत. यातून उत्सुकता शमते तशी ती वाढतेही. हा काळ ग्लोबलायझेशनचा आहे. पण वैश्वीकरणात सांस्कृतिक व्हेंटिलेशन (अभिसरण) अपरिहार्यपणे येते. साहित्य हा संस्कृतीचा मोठा भाग. कार्ल मार्क्सने म्हटले आहे, 'औद्योगिक क्रांतीनंतर उत्पादन व उपभोग या क्षेत्रातच सार्वदेशीय एकरूपता होते असे नाही, तर साहित्य क्षेत्रातही ही प्रक्रिया घडते व विभिन्न साहित्यातून विश्व-साहित्याकडे वाटचाल सुरू होते.'

त्यासाठी अनुवादाचे महत्त्व आणि गरज खूप महत्त्वाची आहे.

प्राचीन काळापासून अनुवाद वा भाषांतरे चालू आहेत. त्याचे कारण धर्मसत्तेची किंवा राजसत्तेची गरज होती. त्या काळचा आढावा घेतला तर लक्षात येते की, हिंदू धर्मग्रंथ संस्कृतात आहेत, तसेच बायबल, कुराण, बौद्धधर्मीय, जैनधर्मीय साहित्य, हिब्रू, अरबी, पाली, अर्धमागधीमध्ये आहे. इतर भाषियांना ते कळणे शक्य नव्हते. या ग्रंथांची भाषांतरे झाली नसती तर त्यातील तत्त्वज्ञानाबद्दल काही कळू शकले नसते. मराठीत तर ज्ञानेश्वरांनी ज्ञानेश्वरी लिहिल्यामुळे भक्तिमार्गाचा उदय पाहायला मिळतो.

सेंट जेरोमने बायबल हिब्रूमधून लॅटिन भाषेत अनुवादित केले. ते भाषांतरित बायबल रोमन कॅथोलिक चर्चमध्ये अनेक शतके मूळ बायबलसारखेच वाचले जात होते.

अशा अनुवादातच एखाद्या शब्दाचा अर्थही चुकीचा वापरला गेला तर काय होऊ शकते, याचा गमतीदार भाग आहे. एका प्रख्यात अनुवादकाकडून बायबलमधल्या 'केरेन' या शब्दाचा अर्थ (अनेक अर्थांपैकी) शिंग असा झाला. खरा अर्थ मशाल आहे. त्यामुळे अनेक चित्रकारांनी मोझेस या कायदेतज्ज्ञाच्या कपाळावर शिंग दाखवलंय. अगदी मायकल अँजेलोसारख्या नावाजलेल्या चित्रकारानेसुद्धा! व्हॅटिकन सिटीत हे चित्र पाहायला मिळते.

'गुरु ग्रंथसाहेब' या शीखधर्मीय धर्मग्रंथाच्या भाषांतरात कबीराच्या एका दोह्याचा अर्थ वाचला, तेव्हा अनुवाद आपल्या मानसिकतेचा भाग कसा झाला, हे पाहून आश्चर्य वाटले. कबीर म्हणतात, 'मी समुद्राची शाई केली, सर्व वनस्पतींची लेखणी केली आणि पृथ्वीचा कागद केला तरी सुद्धा 'हर'च्या (सर्वव्यापी देव) गुणांबद्दल लिहू शकणार नाही.' आपण आईवर निबंध लिहितांना ह्या ओळी अनेक वेळा वापरल्यात.

३. अनुवाद ही राजसत्तेचीही गरज होती. बाहेरच्या देशातून आलेल्या परभाषीय राज्यकर्त्याला धर्मपरायण, पारंपरिक भारतात धर्म काय सांगतोय, हे जाणणे गरजेचे होते. त्यानुसार धर्मग्रंथांची भाषांतरे आजही उपलब्ध आहेत. अकबराच्या काळात रामायण, महाभारत त्याने उर्दूत भाषांतरीत करवून घेतले. अठराव्या शतकात द्यू पेरॉंने उपनिषदांचा पर्शियन अनुवाद केलाय. अनेक ख्रिस्ती मिशनऱ्यांनी संस्कृत ग्रंथ अनुवादले. अर्थात, त्यांनी ते ख्रिश्चन धर्मप्रसारासाठी हव्या असलेल्या माहितीसाठी केले असले तरी त्याचा फायदा जगाला झाला. कारण गटेसारख्या जर्मन महाकवींमुळे आशियाई संस्कृतीसंपन्न देशांच्या तत्त्वज्ञान व साहित्याची थोरवी जगासमोर आली. लॉर्ड मेकॉले मात्र याला अपवाद होता व बेंटीक, विल्बर फोर्स किंवा जेम्स मीलही.

इंग्रजी ही 'बुकगंगा'सारखी अनुवादगंगा आहे. तिचे आगमन सांस्कृतिक दृष्ट्या उपयोगी ठरले.

४. भाषांतराची गरज त्या वाचकांसाठी जास्त आहे, ज्यांना केवळ स्वभाषेचेच ज्ञान आहे, अन्य भाषेतील साहित्य वाचण्याची इच्छा असूनही तशी साधने नाहीत. अर्थात, आजकाल इतर भाषांचेही ज्ञान बहुतेकांना असते. भारत तर दरडोई चार भाषा जाणणारा म्हणून प्रसिद्ध आहे.

५. अनुवादातून माहिती तर मिळतेच, पण त्या त्या प्रांताची, देशाची सांस्कृतिक ओळख होते. त्यांच्या सामाजिक जीवनाची, जीवनपद्धतीची, मूल्यांची, इतकेच काय अंधश्रद्धांची निदान तोंडओळख होते. तेथील राजकीय सत्तांची, प्रवृत्तींची माहिती मिळते. उदाहरणार्थ, रशियन व जर्मन साहित्यातून ही गोष्ट स्पष्टपणे कळते. जीवनमूल्यांची, नीतिमूल्यांची माहिती कळते. थोडक्यात ती साहित्यकृती त्या त्या देशाची संस्कृती विदित करते. दोन्ही महायुद्धांबद्दलची माहिती अनुवादामुळे सखोल

**अनुवादाची गरज आपल्यातील उणिवा, दोष जाणून घेण्यासाठी झालीये, याचे उदाहरण आज स्त्रियांना मिळालेले स्वातंत्र्य आहे. राजा राममोहन राय सारख्या समाजसुधारकांनी इंग्रजी जाणले. समाजरचनेतील दोष जाणवल्याने भारतीय समाजरचनेतील स्त्रियांची स्थिती समजून घेऊन समाजाला ती जाणवून दिली. त्यामुळे प्रखर विरोधांना तोंड देत घटस्फोट, पुनर्विवाहासारख्या गोष्टी समाजप्रवाहात आल्या. धर्मपालांनी ब्रिटिशांची पोलखोल केली ती अनुवादातून. भारतीय शिक्षणपद्धतीचा धुव्वा उडवून फॉर्मल एज्युकेशनची कल्पना या देशावर लादणाऱ्यांच्या मनात 'नेटिवां'चा किती तिरस्कार होता, अशी ब्रिटिश पार्लमेंटमधल्या भाषणांचाच अभ्यासपूर्वक अनुवाद केला. त्यासाठी ते १० वर्षे लंडनला राहिले.**

पद्धतीने मिळाल्याचे विदित आहे. ज्ञान, नव्या विचारधारा, नवीन संकल्पना, कलाक्षेत्रातले बदल, तत्त्वज्ञान आणि भाषा समृद्धीची ओळख करून देते. आपल्या भाषेतल्या पारंपरिक साहित्य प्रकारांची तुलनात्मक रूपे आपल्याला समजतात. दोस्तोवस्की, चेकाव्हसारख्या रशियन लेखकांचे साहित्य आधी इंग्रजीत नंतर प्रादेशिक भाषेत येते, तेव्हा हा प्रवास Twice removed from reality असतो, पण आपण उत्सुकपणे वाचतो. उदाहरणार्थ, तुलनात्मकदृष्ट्या रशियन कथांची रचना वेगळी वाटते. कथा आशयघन आहे पण शेवट धक्कादायक असेलच किंवा टोकदार झालेला असेलच असे नाही.

६. हे होताना आपल्या भाषेचा, साहित्याचा विचार सतत मनात राहतो. त्यातल्या वैशिष्ट्यांची, भाषेच्या समृद्धी व वैशिष्ट्यांचा विचार लेखक/वाचक करतोच. आपल्या संस्कृतीचे व भाषेचे संरक्षण करतो. भाषांतरीत कृतीला आपल्या मातीचा वास देतो. स्वभाषेची समृद्धी यातून होतेच. भाषा परपुष्ट करते.

७. अनुवादाची गरज आपल्यातील उणिवा, दोष जाणून घेण्यासाठी झालीये, याचे उदाहरण आज स्त्रियांना मिळालेले स्वातंत्र्य आहे. राजा राममोहन राय सारख्या समाजसुधारकांनी इंग्रजी जाणले. समाजरचनेतील दोष जाणवल्याने भारतीय समाजरचनेतील स्त्रियांची स्थिती समजून घेऊन समाजाला ती जाणवून दिली. त्यामुळे प्रखर विरोधांना तोंड देत घटस्फोट, पुनर्विवाहासारख्या गोष्टी समाजप्रवाहात आल्या.

धर्मपालांनी ब्रिटिशांची पोलखोल केली ती अनुवादातून. भारतीय शिक्षणपद्धतीचा धुव्वा उडवून फॉर्मल एज्युकेशनची कल्पना या देशावर लादणाऱ्यांच्या मनात 'नेटिवां'चा किती तिरस्कार होता, अशी ब्रिटिश पार्लमेंटमधल्या भाषणांचाच अभ्यासपूर्वक अनुवाद केला. त्यासाठी ते १० वर्षे लंडनला राहिले.

८. मानववंशशास्त्रज्ञांनासुद्धा अनुवाद साहित्याची गरज होती. विशिष्ट वंश उत्पत्ती, विकास व त्यांच्या सांस्कृतिक व सामाजिक विकासाच्या आलेखासाठी अशा संबंधित अनुवादांची आवश्यकता होती.

९. इतर भाषांतील साहित्य न वाचले गेल्यास त्या भाषेतल्या साहित्याला साचलेपणा (stagnancy) व एकसुरीपणा येईल व ते कंटाळवाणे होईल. त्यासाठी अभिसरण (ventilation) -विचारांचे, आशयांचे, भाषा शैलीचे- आवश्यक आहे. हे अनुवादाने साधते. तुलनात्मकता वाचक/लेखकात आपोआप येते. आपल्या भाषेत काय नवीन यायला हवे, कोणत्या विचारधारा साहित्यात येताहेत हे कळण्याचा हा एकमेव (तत्त्वज्ञान सोडून) मार्ग आहे. मार्क्सवाद, वसाहतवाद, वसाहतोत्तरवाद, आधुनिक-उत्तरआधुनिक वाद, स्त्रीवाद, भाषाविज्ञानशास्त्र असे अनेक वाद चळवळीतून आले. पण पोहोचले मराठीत अनुवादाने.

१०. संस्कृतमध्ये उपलब्ध साहित्य सामान्य माणसांपर्यंत पोहोचवण्याचे कार्य ज्ञानेश्वर, हंसस्वामी, ते मुक्तेश्वर- मोरोपंत, विंदा करंदीकर, साखरे-दांडेकरांनी केले. तेलगू भाषेतही आदिकवी नन्नया भटांनी ११व्या शतकात केले. तिक्कन सोमयाजींनी १२२० ते १३०० मध्ये केले. यातून भाषा व्यवहार समृद्ध झाला, पण जनसमूहाच्या जीवनातील सर्वांगीण परिवर्तनाला निकोप व नेटक्या दिशेचे आकलन झाले.

११. उत्तमोत्तम कलाकृतींचे अनुवाद जीवनविषयक जाणिवांचा विस्तार करतात. अनेक संस्कार करतात. जीवनातले विविध कंगोरे अनेक पैलूंतून समजून घेता येतात. लेखकाच्या विचारांची व व्यक्तिमत्त्वाची ओळख



अनुक्रमणिका

ललितेतर साहित्य, न्यायालयीन कामकाजातले, वृत्तपत्रातले, कायद्याच्या मसुद्याचे किंवा परिभाषेसाठीचे अनुवाद हे वेगळे आहेत. मोगली, संस्थानी किंवा ब्रिटिश राजवटीत इंग्रजी न कळणाऱ्या अशिलांकरवी कायद्याच्या क्षेत्रात देशी भाषेत परिभाषा तयार झालीये, पण वकील आणि न्यायाधीशांच्या मधील नाही. कारण त्या अनुवादात समर्पक प्रतिशब्द तयार करणे ही मोठी जबाबदारी आहे. कारण उपलब्ध शब्दसंपत्ती अपुरी पडू शकते आणि नवीन कृत्रिम शब्दांची निर्मिती करणे गरजेचे होऊ शकते. ही मोठी समस्या आहे. कारण नवा शब्द हा यांत्रिकीपेक्षा अर्थपूर्ण आणि शक्यतो प्रचलित शब्दांशी नातं सांगणारा असावा.

यातून होते. माणसाच्या विकासाला पूर्णत्वाकडे नेणारी ही मोठी गरजेची गोष्ट आहे. हे निर्विवाद.

१२. अनेक प्रांत व देश आहेत आणि अनेक भाषी होणे अशक्य आहे. चौ मुलखाचे साहित्य व संस्कृतीचे ज्ञान व आस्वाद याची गरज अनुवाद भागवतो, असे वसंत बापट म्हणतात.

'मानवाची अंती गोत्र एक' हा आशय तौलनिक साहित्यातून येतो व त्या साहित्य विविधतेतून त्याचे रंगरूप डोळ्यात भरेल हा मोठा लाभ म्हटला पाहिजे.

**समस्या :**

आतापर्यंत हजारो पुस्तकांचे मराठीत अनुवाद झाले आहेत आणि सध्या मराठी प्रकाशकांचा अशा प्रकारच्या पुस्तक प्रकाशनाचा आवडता प्रांत आहे. त्याला व्यावहारिकही बाजू आहे, पण अनुवाद करताना आलेल्या अडचणींची कुठे चर्चा झाल्याचे ऐकीवात नाही.

१. ललितेतर साहित्य, न्यायालयीन कामकाजातले, वृत्तपत्रातले, कायद्याच्या मसुद्याचे किंवा परिभाषेसाठीचे अनुवाद हे वेगळे आहेत. मोगली, संस्थानी किंवा ब्रिटिश राजवटीत इंग्रजी न कळणाऱ्या अशिलांकरवी कायद्याच्या क्षेत्रात देशी भाषेत परिभाषा तयार झालीये, पण वकील आणि न्यायाधीशांच्या मधील नाही. कारण त्या अनुवादात समर्पक प्रतिशब्द तयार करणे ही मोठी जबाबदारी आहे. कारण उपलब्ध शब्दसंपत्ती अपुरी पडू शकते आणि नवीन कृत्रिम शब्दांची निर्मिती करणे गरजेचे होऊ शकते. ही मोठी समस्या आहे. कारण नवा शब्द हा यांत्रिकीपेक्षा अर्थपूर्ण आणि शक्यतो प्रचलित शब्दांशी नातं सांगणारा असावा.

२. अनुवादित रचना त्या मूळ कृतीसारख्या किंबहुना तीच मूळ रचना आहे असे वाचकाला वाटणे गरजेचे आहे. हा जवळ जवळ परकाया प्रवेश आहे. नाटकाच्या बाबतीत अनुवाद होत असला तरी हे एक दृक्‌श्राव्य माध्यम आहे. यात सादरीकरण आहे. भाषेचे स्वरूप बोली भाषेचे असले तरी ही बोली आणि सामान्य व्यवहारातील बोली वेगळी आहे. (माझ्या मानसी कादंबरीत महाराष्ट्रातल्या खेड्यात बोलली जाणारी मराठी- विशेषतः नोकर लोकांच्या तोंडी असणारी भाषा हिंदीत करताना अनुवादकाला प्रश्न पडला होता. कारण हिंदी तशी भाषा वापरलीच जात नाही. शेवटी साध्या हिंदीत ती घेतली गेली.)

शिवाय नाटकाच्या भाषेला दृश्यात्मक स्वरूप असते. शिवाय त्याला देशी रूप द्यावे लागते. अशा वेळी नुसती नावे बदलून परिणाम येत नाही. वि. वा. शिरवाडकरांनी ऑथेल्लो, शेक्सपियरच्या नाटकांचा अनुवाद केला, तेव्हा त्यांनी ऑथेल्लो, यागो, कॅशिओ, डेस्डिमोना ऐवजी महेश्वर, रामदेव, अश्विनी, दमयंती, सोमनाथ इ. नावे ठेवली. पण यामुळे अनुवादाला सममूल्यता येत नाही. शिवाय नाव (title) कायम ठेवले. त्यामुळे सांस्कृतिक भिन्नता राहिलीच. कारण शब्दांमध्ये सांस्कृतिक अर्थाचे पदर असतात. याच नाटकात Toad या शब्दासाठी सर्प ही प्रतिमा सममूल्यक नाही. यातून क्षुद्रपणा, किळस, तिरस्कार दिसत नाही. ही समस्या जाणवते.

३. कवितेच्या भाषांतरात अनेक समस्या आहेत. उदा. ब्लँक व्हर्ससाठी सममूल्यक वृत्त वा छंद नाहीत. उदा. विंदा करंदीकरांनी किंग लियर अनुवादित केले. त्यासाठी त्यांनी चतुष्खंडी निर्यमक मुक्त छंदाचा वापर केला. किंवा गौरी देशपांडेंनी महानिर्वाण इंग्रजीत केले. त्यासाठी कीर्तनकारी शैली वापरली. यात लहान वाक्ये, द्विरुक्ती, सूर योजना व प्रवाहीपणा आणला. पण ते तितकेसे सोपे नसावे.

४. अनुवादात भाषिक स्तरावर पुष्कळ समस्या येऊ



अनुक्रमणिका

शकतात. भाषा वैज्ञानिकांनी इतक्या भाषाशास्त्रीय संकल्पना सांगितल्या आहेत की जीव दडपून जातो. या पद्धतीने गेलो तर अनुवाद प्रक्रियेलाच खीळ बसू शकते. पण ढोबळमानाने अनुवादकाराला दोन्ही भाषांवर प्रभुत्व, संस्कृती ज्ञान, संवेदनशीलता पाहिजे. आशय कायम ठेवून अभिव्यक्ती करणे हे सोपे नाही. शिवाय साहित्यकृतीचा काळ, त्याची वाङ्मयीन साहित्य परंपरा, लेखकाचा हेतू, आकृतिबंध, त्या साहित्यकृतीने वाङ्मयात घातलेली भर हे सगळे सांभाळताना भरपूर अडचणी येऊ शकतात.

शब्दांचे मृदुत्व, सौंदर्य, लालित्य इ. प्रकार, वाक्यरचना, भाषाशैली समवृत्ती पद्धतीने अनुवादणे सोपे नाही. वाक्य पातळीवर, म्हणी, वाक्प्रचार, सुभाषिते किंवा व्यवहारी पातळीवर शब्दांचे झालेले coinage हीपण मोठी समस्या आहे.

मी हरझॉग ही कादंबरी अनुवादित केली; (यात खूप तत्त्वज्ञानातल्या theories आहेत.) तेव्हा gobanan हा शब्दप्रयोग बोली भाषेतला होता. coin केलेला आणि रोज वापरातला होता, पण याचा अनुवाद मला जड गेला. अनेक अमेरिकन लोकांना मला विचारावा लागला. तसेच मल्याळम् भाषेतल्या कादंबरीतही उच्चारांचा प्रश्न मोठा होता. त्यासाठी धनश्री हळबे आणि हरि म्हणून केरळी शिक्षकाची मदत घ्यावी लागली. रवींद्रनाथांच्या चार एकांकिका करतानाही विलास गीतेंची मदत झाली. नावांचे उच्चार ही मोठी समस्या आहे. शिवाय रवींद्रनाथांची भाषा, वाक्यरचना गमतीची आहे. संवादातली वाक्ये ही parabolic आहेत. व्यवहारीभाषेत चाललेला संवाद कधी कल्पनारम्य लालित्यात जाईल हे सांगणे कठीण. दोहोंचा मेळ घालणे ही मोठी समस्या होती.

नावाच्या उच्चारांबाबत विलास गीते यांच्या मते नावाची फक्त लिप्यंतरे व्हावीत. ती बंगाली उच्चारांप्रमाणे लिहू नयेत, असे सुचवलेय.

**उपाय :**

आपल्याकडे अनुवादक एकत्र येऊन समस्या-उपायांवर चर्चा करतात का? मला कल्पना नाही. बहुतेक अनुवादक स्वांतःसुखाय किंवा स्वानंदासाठी किंवा प्रकाशन संस्थेकडून मागितल्याने किंवा साहित्य अकादमीसाठी अनुवाद करतात. काही लेखक हा व्यवसायही करताहेत. अनुवाद करण्याच्या पद्धतीही वेगवेगळ्या आहेत. 'सौहार्द'प्राप्त अनुवादक प्रकाश भातांम्ब्रेकर पुस्तक न वाचताच थेट अनुवाद करायला घेतात. त्यांना अडचणी आजवर तरी जाणवल्या नाहीत, (व्यावसायिक अनुवादांचे मूल्यमापन होत नाही,) हे ते नमूद करतात. उमा कुलकर्णीसारख्या अनुवादकही भाषांतर विषयाचा अभ्यास करून अनुवाद करीत नाहीत.

आपल्याकडे भाषांतराचे कुठलेही तंत्र सर्वमान्य झालेले नाही. भाषांतरकाराचे लक्ष्य भाषा आणि मूळ भाषेवर प्रभुत्व असले पाहिजे, येणाऱ्या समस्या भाषेशी संबंधित असू शकतात. सगळे शब्द माहिती असणे अशक्य असते, पण नित्य वाचनाने शब्द परिचित होतात. वाक्यरचनेची उत्तम समज येऊ शकते. दोन्ही भाषेचे साहित्यातले उत्तम वाङ्मय वाचनात असणे आवश्यक आहे. उत्तम authentic शब्दकोश संग्रही असावेत.

भारतीय साहित्यिकांना जी साहित्यकृती अनुवादित करायची, तो प्रांत व देश पाहण्याची व राहण्याची संधी मिळणं आवश्यक आहे. साहित्यकृतीच्या भवतालाची, संस्कृती व आचाराची माहिती खूप पूरक ठरू शकते. अर्थात, ही जबाबदारी प्रकाशक किंवा साहित्यसंस्थांची आहे. भारतीय लेखक आर्थिक अभावाने हे करणे शक्य नाही.

अनुवादाची सवय शालेय जीवनापासून लागावी यासाठी शाळांच्या अभ्यासक्रमात आणि कृतिसत्रात हे घडवून आणू शकतात.

●

**डॉ. छाया महाजन,**
कल्याणी नर्सिंग होम, न्यू समर्थनगर,
औरंगाबाद, ४३१ ००१.
चलभाष : ०९४२३१८५९०३ / ०९८२३२५५९०२



अनुक्रमणिका

लेख

प्रा.कैलास सलादे

# मराठी ग्रामीण कवितेतील दोन अस्वस्थ दशके

**अस्वस्थ दशकातील मराठी ग्रामीण कविता**

१९९०नंतर मराठी ग्रामीण कवितेच्या स्वरूपात बदल होत गेला. १९९५ ते २०१५ ही ग्रामीण कवितेतील दोन अस्वस्थ दशके होत. या अस्वस्थ दशकाच्या दु:ख-वेदना या काळातील कवींनी ताकदीनिशी मांडल्या आहे. १९९० पूर्वीची ग्रामीण कविता संथ-संयमित सूर पकडणारी ठरली. खेड्यातील वास्तव पकडावे, खेड्यातील दैन्य, खेड्यातील माणसातील प्रेम, जिव्हाळा, निसर्ग विलसते, प्रणयदृश्य वास्तवतेच्या अंगाने टिपली गेली. मात्र १९९० नंतरची कविता वेगळी ठरली. कारण ग्रामीण साहित्य चळवळीच्या प्रयत्नाचा काही एक भाग म्हणून नंतरच्या पिढीला आत्मभान आले. आपण शहरी अभिरुचीचा विचार न करता लिहिले पाहिजे ही साहित्यविषयक जाण आणि भान या पिढीला आलेले दिसते. १९९० नंतर खेड्याचे, शेतीचे प्रश्न आणि संदर्भ बदलले. खेड्याला पारंपरिक साच्यात बांधून ठेवणारी, जगापासून अलिप्त राखणारी बलुतेदारी पद्धत पूर्णतः नष्ट झाली. त्यामुळे स्वयंपूर्ण असणाऱ्या खेड्यांना शहरावर अवलंबून राहावे लागले. यंत्रयुगाच्या अतिक्रमणामुळे कृषिसंस्कृतीवर हल्ले होऊ लागले. या हल्ल्यांमुळे ग्रामीण कवी अस्वस्थ होऊ लागला. खेड्यातील अनेक लिहिणारे नोकरी व्यवसायाच्या निमित्ताने शहरात आले. पण शहराच्या वेगाशी आणि संस्कृतीशी जमवून घेणे या पिढीला जमले नाही. त्यामुळे आपले खेडे किती सुंदर आहे हे आठवण्यात आणि शहर आणि गाव यांची 'Nostalgic' तुलना करण्यात ही कविता रमू लागली. १९९०च्या जागतिक पार्श्वभूमीवर जागतिकीकरणाची सुरुवात होऊ लागली. या जागतिकीकरणाचे परिणाम लवकरच ग्रामीण भागात दिसून येऊ लागले. जागतिकीकरणाची प्रक्रिया आणि त्याचे परिणाम समजून घेण्यात ग्रामीण कवितेला दहा-बारा वर्षांचा कालावधी जावा लागला. या जागतिकीकरणाने एक गोंधळाची परिस्थिती निर्माण केली. जुने खेडे उद्ध्वस्त होऊ लागले, परंपरा, मूल्ये, संस्कृती बदलू लागली. शहरीकरणाच्या विकाराने खेड्यांचे संदर्भ बदलू लागले. शिक्षणव्यवस्थेने खेड्यातल्या नव्याने शिकू बघणाऱ्या पिढीचा भ्रमनिरास होऊ लागला. ग्रामीण सुशिक्षितांचे लोंढे आणि त्यांचे गुंता-गुंतीचे प्रश्न सुरू झाले. विकासाच्या गोंडस नावाखाली भकासीकरणाचे प्रयत्न सुरू झाले. प्रकल्प, धरणे, उद्योग क्षेत्रे, मॉल्स निर्मितीसाठी खेडे विस्थापित होऊ लागले. ह्या विस्थापितांचे प्रश्नही लेखक-कवींना अस्वस्थ करू लागले. हरितक्रांतीने निर्माण केलेला आशावाद जास्त काळ टिकला नाही. हरितक्रांतीमुळे विकास झाला असे ओरडणाऱ्या पुढाऱ्यांना कळालेच नाही की, ही खेड्यांची प्रगती झाली की मुका मार लागावा तशी सूज आली? ही प्रगतीची सूज हळूहळू ओसरू लागली. राजकारणाच्या गलिच्छ चेहऱ्याने खेड्यामध्ये आकार घ्यायला सुरुवात केली. ह्या राजकारणाच्या विकृतीकरणामुळे खेड्यांची एकी भंग पावली आणि खेडे गावसंघर्षाच्या पार्श्वभूमीवर खडे ठाकले. जागतिकीकरणामध्ये व्यापारी पिकांना प्राधान्य दिले गेले, वाढत्या कर्जबाजारीपणामुळे शेतकऱ्यांच्या आत्महत्यांचे भयानक सत्र सुरू झाले. या होणाऱ्या आत्महत्यांमुळे लिहिणाऱ्या पिढीच्या मनात चीड निर्माण होऊ लागली. व्यवस्थेला प्रश्न विचारण्याचे धाडस या काळातील कवींनी आणि कवितेने केले. व्यवस्था उलथून टाकल्याशिवाय शेतकऱ्यांचे प्रश्न सुटणार नाही ह्या जाणिवेतून दलित कवितेतला विद्रोह आपसूक स्वीकारला. मात्र दलित साहित्याचा लढा हा जातिव्यवस्थेविरुद्ध होता. ग्रामीण कवितेने हा विद्रोह अर्थव्यवस्थेविरुद्ध पुकारण्याचा प्रयत्न केला. दलित कवितेमागे डॉ.बाबासाहेब आंबेडकरांचे भरभक्कम तत्त्वज्ञान उभे होते मात्र ग्रामीण कवितेचे तसे झाले नाही. ग्रामीण कवितेमागे निश्चित असे तत्त्वज्ञान असल्याचे

**१९९०च्या जागतिक पार्श्वभूमीवर जागतिकीकरणाची सुरुवात होऊ लागली. या जागतिकीकरणाचे परिणाम लवकरच ग्रामीण भागात दिसून येऊ लागले. जागतिकीकरणाची प्रक्रिया आणि त्याचे परिणाम समजून घेण्यात ग्रामीण कवितेला दहा-बारा वर्षांचा कालावधी जावा लागला. या जागतिकीकरणाने एक गोंधळाची परिस्थिती निर्माण केली. जुने खेडे उद्ध्वस्त होऊ लागले, परंपरा, मूल्ये, संस्कृती बदलू लागली. शहरीकरणाच्या विकाराने खेड्यांचे संदर्भ बदलू लागले... विकासाच्या गोंडस नावाखाली भकासीकरणाचे प्रयत्न सुरू झाले. प्रकल्प, धरणे, उद्योग क्षेत्रे, मॉल्स निर्मितीसाठी खेडे विस्थापित होऊ लागले. ह्या विस्थापितांचे प्रश्नही लेखक-कवींना अस्वस्थ करू लागले.**

दिसत नाही. दलित कवितेतील विद्रोहाचे टोकदार स्वरूप ग्रामीण कवितेला अंगीकारता आले नाही. दलित कवितेने इथल्या संस्कृती आणि व्यवस्थेला नकार दिला तसा नकार ग्रामीण कवितेला देता येणे शक्य नव्हते. म्हणून ग्रामीण कवितेचा विद्रोह सरकार, नोकरशाही, सावकारशाही, लुटारूशाही यांच्या विरोधी असल्याचे दिसते. मात्र या विद्रोहाचे स्वरूप संयमशीलच होते.

१९९०नंतर ग्रामीण कविता लिहिणाऱ्यांची संख्या लक्षणीय वाढली. ह्याची अनेक कारणे आहेत. ग्रामीण साहित्य चळवळीने खेड्या-गावांमध्ये छोटी छोटी ग्रामीण साहित्य संमेलने घेतली, शिबिरे घेतली. यातून नव्याने लिहिणाऱ्यांना दिशा मिळाली. खेड्यातील अनेक कवी-लेखक शहरात स्थायिक झाल्याने शहरवासियांचे रंजन करणारी कविता याही काळात काही लुडबुडू कवींकडून लिहिली गेली. मात्र नव्या दमाने, ताकदीने लिहिणारे, नव्या प्रश्नांना भिडणारे अनेक कवी ह्याच काळात ग्रामीण कविता लिहू लागले. ग्रामीण कविता चिंतनशील बनली. या काळात इंद्रजित भालेराव यांचा 'पीकपाणी', 'पेरा', 'आम्ही काबाडाचे धनी', यासारखे संग्रह प्रसिद्ध झाले. भालेरावांची बहिणाबाईंच्या कवितेशी नाते सांगणारी साधी सोपी कविता या काळात लिहिली जात होती. बदलते खेडे, खेड्यातील प्रश्न, शेतकऱ्यांचे दुःख-कष्ट, पराकोटीचे दारिद्र्य, गावगाड्याचे बदललेले स्वरूप, दलालाकडून होणारी लूटमार हे भालेराव यांच्या कवितेचे विषय झाले आहे. शेतकऱ्यांचे दुःख साध्या सोप्या भाषेत मांडल्याने त्यांना कारुण्याची झालर प्राप्त झाली आहे. भालेरावांच्या कवितेचा नंतरच्या पिढीवर जाणवण्याइतपत प्रभाव पडलेला दिसतो. भालेरावांनी कवितेत प्रथमतः विद्रोहाचा वापर केला हा विद्रोह नंतरच्या पिढीने उचललेला दिसतो. भालेरावांच्या कवितेने गाव, खेडे, शेती, शेतीत राबणारा शेतकरी, त्याचे दारिद्र्य, त्याची होणारी लूटमार, नोकरशाहीचे विकृत स्वरूप वास्तवाच्या पातळीवर मांडले असले तरी काळजातली तीव्र स्पंदने भालेरावांना पकडता आली नाही. वर्णनात्मक पातळीवरची वास्तवता चिंतनशील बनली नाही. तरीही भालेरावांची कविता महत्त्वाची आहे. ह्याच काळात प्रणयसृष्टीत हरवलेली ना.धों.महानोरांची कविता वास्तवाच्या किनाऱ्याला लागलेली दिसते. 'प्रार्थना दयाघना' आणि 'पानझड'मध्ये महानोरांनी शेतक-यांची होणारी होरपळ आणि खेड्यांचे उद्ध्वस्त स्वरूप मांडले. या काळात या कवींबरोबर आणखी काही महत्त्वाचे कवी कविता लिहीत होते. त्यात नारायण सुमंत, नारायण कुलकर्णी कवठेकर, उत्तम कोळगावकर, राजन गवस, प्रकाश होळकर, मदन पाटील, सदानंद देशमुख, संतोष पवार, केशव देशमुख, प्रतिमा इंगोले, श्रीकांत देशमुख, लक्ष्मण महाडिक, तुकाराम धांडे या कवींचा उल्लेख करावा लागेल. नव्या प्रश्नांना ताकदीने मांडणारी कविता या कवींनी लिहिली. यातील काही कवींनी पूर्वसूरींचे जाणवण्याइतपत अनुकरण केल्याने त्यांच्या सर्जनशीलतेला मर्यादा पडल्या.

**ताकदीने लिहिणारी नवी पिढी-**

२००० नंतर जागतिकीकरणाची प्रक्रिया आणि तिच्या तीव्र परिणामाची जाणीव ह्या काळातील कवी आणि कवितांना झालेली दिसते. शेतकऱ्यांच्या होणाऱ्या आत्महत्या, बेभरवशाची शेती, वाढणारा कर्जबाजारीपणा, सहकार चळवळीचे अपयश आणि त्यात बोकाळलेला भ्रष्टाचार, शिक्षणव्यवस्थेतील अपप्रवृत्ती, राजकारणाची विकृती, प्रसारमाध्यमांनी खेड्यात आणून पोहोचवलेला उत्तर आधुनिकतावादी भोगवादी चेहरा. राजकारण्यांच्या मतलबी व्यवहारात कंडम म्हणून वापरली गेलेली तरुण पिढी, त्या पिढीची व्यसनाधीनता, खेड्याचे वाढत जाणारे

बकालीकरण, ग्रामीण मनोवृत्तीचे झालेले शहरीकरण, निराशावाद, महागाई, बेकारी, अच्छे दिनाचे तकलादू स्वप्न बघून स्वप्नभंग झालेली, हादरलेली, गलितगात्र झालेली निराश पिढी खेड्यामध्ये वाढू लागली आहे. शिक्षणामुळे खेड्यापासून हरवलेली व नोकरी न मिळाल्याने शहरात सामावू न शकणारी परात्म पिढी पर्यायाने 'बार संस्कृती'ला जवळ करू लागली. या पिढीसमोर फार मोठे विचित्र पेच निर्माण झाल्याने गोंधळलेल्या अवस्थेत कवितेतून काही प्रश्न मांडू लागली. बिघडलेल्या गावगाड्यातील अनेक प्रश्न ही पिढी मांडू लागली आहे. २००० नंतर लिहिणाऱ्या कवींमध्ये नव्या प्रश्नांना ताकदीने भिडणारे अनेक आशावादी चेहरे दिसतात. श्रीकांत देशमुख, ऐश्वर्य पाटेकर, तुकाराम धांडे, पृथ्वीराज तौर, केशव खटींग, पी.विठ्ठल, कल्पना दुधाळ, विष्णू थोरे, भरत दौंडकर, कैलास दौंड, मोहन कुंभार, विजयकुमार मिठे, विनायक येवले, कैलास सलादे, विनायक पवार, नारायण पुरी, संतोष नारायणकर, अशोक कोळी, बालाजी मदन इंगळे, रवी करडे, ललित अधाने, लक्ष्मण बाराहते, ज्ञानेश उगले, गणेश मरकड, नामदेव कोळी, लता ऐवाळे, किरण भावसार, सचिन गांगुर्डे, रवींद्र कांगणे, हनुमंत चांदगुडे, अमृत पेलंग, प्रभाकर शेळके, दिगंबर देवढे, गुरुदेव गांगुर्डे, रावसाहेब जाधव, राजेंद्र उगले, राजेन्द्र सोमवंशी, नीलेश शेळके, शैलेश चव्हाण, राजेंद्र दिघे, अरुण पवार, रावसाहेब कुंवर, नागेश शेलार, दत्ता सोनवणे, किरण संधान, संतोष झोमन, सोमनाथ पवार, सोमनाथ फुगट, रवी देवरे, विलास पगार, सागर जाधव, विलास माळी, दयाराम गिलाणकर, काशिनाथ वेलदोडे, शिवाजी भालेराव, रुपाली खैरनार ही नव्या पिढीतील कवी मंडळी महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यातून वेगवेगळ्या जाणिवांचे आविष्कार करताना दिसते. वर दिलेली कवींची यादी आणखी वाढू शकते. इथे संशोधनाच्या काही मर्यादांमुळे काही महत्त्वाच्या कवींचा उल्लेख राहून जाण्याची शक्यताही नाकारता येत नाही. यातील काही कवींचे एक किंवा अधिक काव्यसंग्रह प्रकाशित झालेले आहे. काही कवींचे संग्रह प्रसिद्ध झालेले नसले तरी नियतकालिकातून स्फुट कविता प्रसिद्ध झाल्या आणि होत आहे. त्यामुळे त्यांचे मूल्यमापन करून निष्कर्ष काढण्याची घाई आताच करणे योग्य ठरणार नाही. यातल्या बऱ्याच कवींवर पूर्वसूरींचा प्रभाव जाणवत असला तरी त्यातून त्यांना स्वतःची वाट शोधता येईल इतकी आशावादी कविता यातून निर्माण होत आहे.

**ग्रामीण कवितेच्या मर्यादा-**

जानपद कविता ही ग्रामीण नव्हतीच. ग्रामीण जगण्याचा अनुभव नसताना केवळ सहानूभुतीतून ग्रामीण जगण्याचा आविष्कार केला गेला. तो आविष्कार फसवा होता. स्वप्नरंजन आणि स्वान्तःसुखाय ही जानपद कवितेची प्रेरणा होती. त्यामुळे ग्रामीण कविता वाढू शकली नाही. ही ह्या जानपद कवितेची मर्यादा नंतर ग्रामीण भागतून आलेल्या कवींना खटकू लागली. ग्रामीण कविता म्हणजे काय? तिच्या प्रेरणा कोणत्या? हे माहीत नसताना काही कवींनी षरीहळेपरलश्रश कविता प्रसवल्या. मुळात 'ज्या कवितेत ग्रामीण जनजीवनाचे चित्रण ग्रामीण संवेदनशीलतेने केलेले असते, तिला ग्रामीण कविता असे म्हटले जाते. या कवितेत खेडे, खेड्याशी संलग्न असलेले कृषिजीवन, खेड्यातील जनजीवनाचे दुःख, हर्ष, दारिद्र्य, रूढी, परंपरा, संस्कृती या साऱ्यांचा समावेश होतो.'[१] हे आकलन व्हायला बराच कालावधी जावा लागला. नंतर आनंद यादव, ना.धों. महानोर, विठ्ठल वाघ यांसारखे कवी लिहिते झाले. त्यांनी ग्रामीण कवितेचे स्वरूप बदलविण्यास हातभार लावला. मात्र ग्रामीण कविता आपुलकीने लिहिणाऱ्यांची संख्या या काळात नगण्यच होती.

१९९०नंतर ग्रामीण कविता लिहिणाऱ्यांच्या संख्येत वाढ झाली. चांगली ग्रामीण कविता निर्माण होऊ लागली. अस्सल ग्रामीण परिवेश धारण केलेली व मातीशी प्रामाणिक असलेली कविता १९९०नंतर लिहिली गेली. मात्र यात काही अपवाद सोडले तर quality पेक्षा quantity च प्रभावित ठरली. या काळात मोठ्या संख्येने कविता लिहिल्या गेल्या मात्र या कवींच्या कवितेत 'ग्रामीण जीवनानुभवांचे विश्वही फार मोठे नाही, फार व्यापक नाही. ग्रामीण समाज हा कृषिकेंद्रित असतो ही बाब खरीच आहे. परंतु ग्रामीण समाजाचे, संस्कृतीचे कृषिकेंद्रित असणे हे तरी सर्वार्थाने या लेखकांच्या लक्षात आलेले आहे का? चांभार कुंभारापासून कोल्हाटी कैकाड्यापर्यंत सर्वच घटक ग्रामसंस्कृतीशी, कृषिजीवनाशी बांधलेले असतात, याची जाणीव किती ग्रामीण लेखकांना आहे?'[२] हा नागनाथ कोत्तापल्ले यांचा प्रश्न ग्रामीण कवितेने विचारात घ्यायला हवा होता, मात्र तसे झालेले दिसत नाही.

ग्रामीण भागामध्ये अनेक छोटी मोठी ग्रामीण साहित्य संमेलने सुरू झाली. या संमेलनांना जोडूनच काव्यसंमेलने होऊ लागली. स्वतंत्ररीत्या काव्य संमेलने, काव्य मैफिली,





अनुक्रमणिका

काव्यगायनाचे जाहीर कार्यक्रम यांचे पेव फुटले. ग्रामीण साहित्य संमेलनांनी नवोदितांना साहित्यिक भान आणि जाण द्यायला हवी होती, मात्र यात ते कमी पडले. नवोदितांच्या संहिता तपासून त्यांची चिकित्सा व्हायला हवी, मात्र तसे झाले नाही. ग्रामीण भागात काव्य संमेलनाच्या नावाखाली काव्यगायनाचे जाहीर कार्यक्रम घेतले जाऊ लागले. चांगले भरघोस मानधन घेऊन 'काव्यवराती' मिरवणारे सुपारी संप्रदाय उदयाला आले. या संप्रदायातील कवींनी व्यासपीठावर टाळ्या मिळवणाऱ्या कवितांना जन्म दिला. श्रोता व प्रेक्षकशरण कविता लिहून हीच खरी ग्रामीण कविता असा चुकीचा आदर्श त्यांनी नव्या लिहित्या हातासमोर उभा केला. त्यामुळे कविता हा चिंतनशील काव्यप्रकार आहे, याचे भान नव्या पिढीला नसल्याचे जाणवते. ग्रामीण भागात लिहिण्यासाठी जगणे तेवढेच अस्सल असावे लागते हे सांगणारी तुकारामांची कविता, त्याचप्रकारचे आदर्श नव्या कवींसमोर ठेवले गेले नाहीत. चार टाळ्या मिळविता आल्या की तो 'महाकवी' झाला अशी समजूत करून देण्याचा हेतुत: प्रयत्न या व्यासपीठीय मंडळींनी केला. त्यामुळे कवींची एक पिढीच्या पिढी बरबाद झाली हे सत्य स्वीकारायला हवे. या व्यासपीठांच्या दुष्ट चक्रात सापडलेले कवी टाळ्यांच्या मागे लागल्यामुळे चांगली कविता त्यांच्या हातातून सुटत गेली. त्यामुळे सर्व नव्या कवींची नावे डोळ्यांसमोर ठेवून एकही अस्सल कवी भेटत नाही.'' गवसांनी व्यक्त केलेली ही शोकांतिका विचार करायला लावणारी आहे.

व्यासपीठीय कवितांनी आणि कवींनी ग्रामीण कविता

> **खरे तर ग्रामीण कवितेची सुरुवात म.फुल्यांच्या कवितेपासून मानायला हवी. ग्रामीण कवितेने आपली प्रेरणा लोकसाहित्य, संतसाहित्य, म.फुल्यांचे साहित्य यांतून घेतली असती तर आजच्या ग्रामीण कवितेचे स्वरूप निश्चितच वेगळे राहिले असते. ग्रामीण कवितेच्या प्रारंभापासून ते आजपर्यंतच्या ग्रामीण कवितेचे मूल्यमापन करताना एक गोष्ट जाणवते ते म्हणजे ग्रामीण कवींनी बदलत्या ग्रामवास्तवांना सामोरे गेले पाहिजे. बदलांना स्वीकारून नव्या आव्हानांना पेलण्याची तयारी ठेवली पाहिजे. जगण्याशी प्रामाणिक राहून सर्जनशील अभिव्यक्ती केली पाहिजे. केवळ गाव, पांढरी, विठ्ठल, बाप-आई, दुष्काळ, सावकार, आत्महत्या किंवा शहरात राहून गाव किती सुंदर आहे ह्या nostalgic भूपाळ्यांना टाळून नव्या जाणिवा, संवेदना, तीव्र स्पंदनांसहित कवितेत टिपायला हव्यात. त्यासाठी ग्रामीण कवींना अभ्यासाची आणि मेहनतीची फारच गरज आहे असे प्रामाणिकपणे वाटते.**

जी काव्य संमेलने होतात, त्यात गंभीर स्वरूपाची ग्रामीण कविता चालत नाही. ती टाळ्या घेत नाही. त्यामुळे संयोजकांकडून टाळ्या घेऊ कवितांची मागणी केली जाते. ही संमेलने वा काव्य मैफली ऐकायला येणारा श्रोतृवर्ग दोन घडीची करमणूक म्हणून जर या काव्यसंमेलनांकडे बघत असेल तर ग्रामीण कविता थोड्या दिवसात हास्याचा विषय झाल्याशिवाय राहणार नाही. व्यासपीठावरून अनेक कविता गायल्या जातात. मुळात कविता गाऊ नये असे मुळीच नाही. मात्र या कवितेचे गाणे व्हायला नको. आज काव्यसंमेलनांमध्ये हलकी फुलकी, विनोदी ढंगाची कविता सादर करून प्रचंड टाळ्या आणि कवितेला वन्समोअर मिळविण्याची केविलवाणी अपेक्षा कवी करताना दिसतात. ही गोष्ट ग्रामीण कवितेला घातक आहे. मुळात कविता हा गंभीर साहित्यप्रकार आहे. याबद्दल आपले निरीक्षण नोंदवताना राजन गवस लिहितात की, 'कविता ही एक व्यासपीठीय, टाळ्या मिळविण्यासाठी लिहिली जाणारी गोष्ट नसून कविता हे अस्सल जगण्याचे सार असते. कविता लोकप्रिय केली असा प्रतिवाद या कवींकडून केला जातो त्यात निश्चित तथ्ये आहेत. ज्या परिसराला कविता काय असते हे माहीत नव्हते त्या साहित्याभावग्रस्त भागात 'कवितेचे नवे कान' तयार केले. पण कवितेविषयीचे चुकीचे गैरसमजही पसरविले गेले. त्यातून नवीन लिहिणाऱ्या कवींच्या मनात गोंधळ आणि न्यूनगंड निर्माण होत गेले. आपल्याला व्यासपीठावर कवितेचे सादरीकरण चांगले करता येत नाही, आपल्या कवितांना व्यासपीठावर प्रतिसाद आणि टाळ्या मिळत नाही, आपला आवाज कविता गायनासाठी सुमधुर नाही यासारख्या कारणांमुळे गंभीर प्रवृत्तीची कविता लिहिणारे नवोदित कवी कविता लेखनापासून दूर झालेले दिसतात. बऱ्याच कवींचा पहिला काव्यसंग्रह चांगला गाजला. त्यावर साहित्यवर्तुळात चांगली चर्चाही घडून आली. जाणवण्याइतपत 'स्पार्क' त्यांच्या कवितेत असूनही नंतर काव्यगायनाकडे वळल्याने व सुपारी संप्रदायात सामील होऊन कवितेच्या 'बारीत' मिरविण्यात हे कवी धन्यता मिळवू लागल्याने ग्रामीण





अनुक्रमणिका

कवितेचे फार मोठे नुकसान झाले. काही कवी चित्रपट गीतांकडे वळल्याने, चित्रपटगीते लिहून प्रसिद्धी आणि पैसा मिळविण्याचा व्यवहारवादी दृष्टिकोन स्वीकारल्याने काव्यात्मक सर्जनशीलतेला मर्यादा आल्या. चित्रपट गीते आणि कविता या दोन्हीतील आविष्कार शैलीतील भिन्नता या कवींच्या लक्षात आली नाही. त्यामुळे अशा काव्यगायनोत्सुक कवींना डॉ.पंडितराव पवार गंभीरतेने सुनवतात की 'कवींनी काव्यगायन, काव्यवाचन यात आपला अधिक वेळ घालविला तर अजून त्यांच्या आशयाच्या सर्जनशील आणि बहुआयामी कवितेला रसिक मुकतील असा धोकाही आहे. म्हणून आजची 'वाहवा' उद्याच्या अधिक विचारशील कवितेला अडथळा ठरू नये.'[४]

मराठी ग्रामीण कवितेची समीक्षा व्हावी तशी झाली नाही. दलित कवितेला जसे समर्थक समीक्षक लाभले तसे भाग्य ग्रामीण कवितेच्या वाट्याला आले नाही. ग्रामीण कवितेची जी काही समीक्षा झाली, त्यातही आस्वादक समीक्षेचा भाग अधिक आहे. कवितेचे रसग्रहण करणे म्हणजे समीक्षा करणे होय असा काहीसा ग्रह या ग्रामीण कवितेच्या समीक्षकांचा झालेला दिसतो. चिकित्सक, तटस्थ, परखड समीक्षा आणि समीक्षक ग्रामीण कवितेला मिळू नये हे ग्रामीण कवितेचे दुर्दैवच होय. ग्रामीण कवितेच्या समीक्षकांमध्ये आनंद यादव, नागनाथ कोत्तापल्ले, रा.ग.जाधव, केशव देशमुख, राजन गवस, रमेश वरखेडे, एकनाथ पगार, इंद्रजित भालेराव, कैलास सार्वेकर, रणधीर शिंदे यांसारख्या समीक्षकांची नावे महत्त्वाची आहेत. ग्रामीण कवितेची समीक्षा ही आस्वादात्मक, कळपशरण, कौतुकसोहळी, ज्याची खावी पोळी त्याची वाजवावी टाळी, तू माझ्यावर लिही मी तुझ्यावर लिहितो या स्वरूपाची आहे. नव्याने लिहिणाऱ्या कवींना मार्गदर्शन होईल अशा समीक्षेचा अभावच जाणवतो. 'आज प्रस्थापित नवोदितांची संहिता समोर आल्यानंतर त्यातील उणिवा कठोरपणे दाखविणे हेतुतः टाळतात. कारण तो त्यातून दुखावेल, आपल्या पंखापासून बाजूला जाईल, या भीतीने व आपली बगल शाबूत ठेवण्यासाठी 'छान छान', 'हेही छान, तेही छान', 'सर्व काही छान' अशी खोटी भ्रामकता नवोदितांसमोर ठेवत आहेत. परिणामी चांगले काय? वाईट काय? आपल्या परंपरेत बसणारे काय? परंपराबाह्य काय? हा अभिरुचीचा विवेक नवोदितांत रुजू शकला नाही. फक्त छान-छानवादी, टाळकरी संप्रदाय निर्माण झाले आणि असे संप्रदाय भागाभागात तयार करण्यात लोक धन्यता मानू लागले, हे वाईट आहे. कारण त्यामुळेच वाङ्मयीन पर्यावरणाचे प्रदूषण वाढत आहे.'[५] ग्रामीण कवितेच्या समीक्षेमध्ये या प्रदूषणाने अनेक निष्पाप लिहिणाऱ्यांचा बळी जायचे थांबलेले नाही.

मराठी ग्रामीण कवितेला समीक्षेचा जसा अभाव आहे, तसा ग्रामीण कवितेला व्यासपीठ मिळवून देणाऱ्या व सर्वव्यापी मूल्यमापन करणाऱ्या मासिके-नियतकालिकांचा अभावच आहे. आज घडीच्या अनेक मराठी नियतकालिकांमध्ये ग्रामीण कविता आणि समीक्षा छापून येते ही समाधानाची बाब असली तरी तो अवकाश पुरेसा नाही. मराठी कवितेला वाहिलेली 'कवितारती', 'काव्याग्रह' सारखी नियतकालिके सापडतात, पण ग्रामीण कवितेला व काव्यव्यवहारांना वाहिलेले एकही नियतकालिक नाही असे खात्रीने म्हणता येते. ग्रामीण कविता विशेषांक निर्माण करण्याचे प्रयत्न झाले असतीलही मात्र ग्रामीण कवितेच्या वृद्धीला हे प्रयत्न पुरेसे नाही. ग्रामीण कविता आणि समीक्षेला प्राधान्य देणाऱ्या काही नियतकालिकांचा उल्लेख करणे आवश्यक आहे. त्यात 'मुरळी', 'तिफण', 'अक्षरवैदर्भी', 'कादवाशिवार', 'ऊर्मी', 'अक्षरपेरणी' यांचा समावेश होतो.

मराठी ग्रामीण कवितेमध्ये स्त्री कवयित्रींचे प्रमाण फारच नगण्य आहे. तसे पाहिले तर ग्रामीण कवितेची खरी सुरुवात स्त्री कवयित्रीच्या (बहिणाबाई चौधरी) कवितेने झालेली आहे. मात्र दलित स्त्री कवयित्रींच्या तुलनेत ग्रामीण स्त्री कवयित्रीचे प्रमाण खूपच कमी आहे. प्रतिमा इंगोले, कल्पना दुधाळ, लता ऐवळे ही नावे सोडली तर दुसरी नावे आठवत नाहीत. स्त्री कवींच्या अभावामुळे ग्रामीण कवितेत स्त्री जगण्याचे खूप मोठे विश्व येऊ शकले नाही. ग्रामीण स्त्रीच्या वाट्याला फार मोठे दुःखभोग येऊनही ती वेदना ग्रामीण कवितेत आली नाही. ग्रामीण स्त्रीच्या दुःखाची अभिव्यक्ती ही जात्यापाळच्या ओव्याच्या रूपाने कवितेतूनच होत होती तरी ग्रामीण कवितेत स्त्रियांच्या कवितांचा अभाव का, हा संशोधनाच विषय ठरावा. या प्रश्नाचे उत्तर स्त्रीवरील सांस्कृतिक वर्चस्वामध्ये सापडू शकतो.

जानपद कवितेपासून मराठी ग्रामीण कवितेची सुरुवात झाली असे मानले जाते. पहिल्या पिढीतील बऱ्याच कवींचे भरण पोषण ह्या जानपद कवितेवरच झाल्याने यांच्या कवितेला मर्यादा पडतात. खरे तर ग्रामीण कवितेची सुरुवात म.फुल्यांच्या कवितेपासून मानायला हवी. ग्रामीण कवितेने आपली प्रेरणा लोकसाहित्य, संतसाहित्य, म.फुल्यांचे साहित्य यांतून घेतली असती तर आजच्या ग्रामीण कवितेचे

स्वरूप निश्चितच वेगळे राहिले असते. ग्रामीण कवितेच्या प्रारंभापासून ते आजपर्यंतच्या ग्रामीण कवितेचे मूल्यमापन करताना एक गोष्ट जाणवते ते म्हणजे ग्रामीण कवींनी बदलत्या ग्रामवास्तवांना सामोरे गेले पाहिजे. बदलांना स्वीकारून नव्या आव्हानांना पेलण्याची तयारी ठेवली पाहिजे. जगण्याशी प्रामाणिक राहून सर्जनशील अभिव्यक्ती केली पाहिजे. केवळ गाव, पांढरी, विठ्ठल, बाप-आई, दुष्काळ, सावकार, आत्महत्या किंवा शहरात राहून गाव किती सुंदर आहे ह्या nostalgic भूपाळ्यांना टाळून नव्या जाणिवा, संवेदना, तीव्र स्पंदनांसहित कवितेत टिपायला हव्यात. त्यासाठी ग्रामीण कवींना अभ्यासाची आणि मेहनतीची फारच गरज आहे असे प्रामाणिकपणे वाटते.

●

संदर्भ सूची-


१) कैलास सार्वेकर, 'मराठी ग्रामीण कवितेचा इतिहास', मेहता पब्लिकेशन हाउस, पुणे, प्र.आ.ऑक्टो.१९९९, पृ.१.

२) नागनाथ कोत्तापल्ले, 'ग्रामीण साहित्य स्वरूप आणि शोध', स्वरूप प्रकाशन, औरंगाबाद. द्वि.आ. डिसें.२०१०, पृ.११६.

३) पंडितराव पवार, 'मराठी कविता आकलन आणि आस्वाद', दास्ताने रामचंद्र आणि कंपनी, पुणे, २००५, पृ.३४१.

४) राजन गवस, 'टाळ्यात अडकलेली व्यासपीठे', संपा. सुमती लांडे, वाङ्मयीन चळवळी आणि दृष्टिकोन, शब्दालय प्रकाशन, श्रीरामपूर, प्र.आ. जाने.२००८, पृ.२१२.

५) तत्रैव, पृ.२१३.



**प्रा.कैलास सलादे,**
**साहाय्यक प्राध्यापक,**
कला, वाणिज्य व विज्ञान महाविद्यालय
ओझर मिग, ता. निफाड, जि. नाशिक.
चलभाष : ९९२१ ५२८ ४२१


---

## अभिष्टचिंतन

- आपल्या कसदार लेखनाने आणि निस्पृह वृत्तीने केलेल्या वाङ्मयीन चळवळीतील कामामुळे सर्वपरिचित असलेले ज्येष्ठ साहित्यिक **प्रा. मधू जामकर** यांचे अमृतमहोत्सवी वर्षानिमित्त, तसेच परिषदेचे माजी विश्वस्त **राजा फडणीस** आणि माजी संमेलनाध्यक्ष **राजेंद्र बनहट्टी** यांचे सहस्र चंद्रदर्शनानिमित्त **अभिष्टचिंतन!**

## अभिनंदन!

- **डॉ. संदीप विठ्ठलराव सांगळे, डॉ. शिरीष लांडगे** आणि **डॉ. डी. पी. पवार** यांची सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठाच्या मराठी अभ्यास मंडळावर विक्रमी मतांनी निवड झाल्याबद्दल त्यांचे **हार्दिक अभिनंदन!**

- सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठाच्या अधिसभा सदस्यपदासाठी मराठी विभागाचे **प्रा. डॉ. मनोहर जाधव** यांची निवड झाल्याबद्दल त्यांचे **हार्दिक अभिनंदन!**






अनुक्रमणिका

लेख

**प्रा. विद्या सुर्वे बोरसे**

साहित्य आणि समाज यांचा संबंध हा व्यामिश्र आणि गुंतागुंतीचा आहे. कलावाद किंवा जीवनवाद अशा कोणत्याही नौकेत बसलात तरी मानवी जगण्याशी आणि सामाजिक स्थित्यंतरांशी साहित्याचा असणारा संबंध हा तोडता येत नाही. सामाजिक घडामोडी व बदल यांचे साहित्यविश्वावरती दूरगामी आणि मूलगामी स्वरूपाचे परिणाम होत असतात. समकालीन कवितेच्या संदर्भात हे बदल तपासण्याचे कार्य या निबंधात केले आहे.

कलाकृतीला तिच्या जन्माशी संबंधित स्थलकालाचा संदर्भ हा असतो. अगदी कालजयी म्हणवल्या गेलेल्या आणि श्रेष्ठ ठरलेल्या कलाकृतींमधूनही स्थलकाल अवकाशाचा हा संदर्भ अधोरेखित करता येतो. लेखक, कलावंत ज्या अवकाशाचा अंश असतो, त्या समकाळाचे दुवे, राजकीय, धार्मिक, आर्थिक, सामाजिक, तात्त्विक, वैज्ञानिक, तांत्रिक, ऐतिहासिक विचारधारा आणि घडामोडी यांचे प्रभाव कलाकृतीमधून स्पष्ट-अस्पष्टपणे व्यक्त होताना दिसतात.

समकालीन असे म्हणताना व १९९० नंतरच्या काळातील म्हणजेच मागच्या सव्वीस वर्षांतील मराठी कवितेविषयी विचार करताना या पाव शतकातील हालचाली आणि विचारधारांचे ताणेवाणे व एकमेकांवर त्यांनी केलेल्या कुरघोड्या तपासणे गरजेचे आहे.

इ. स. १९९० च्या अगदी आरंभी विशिष्ट धर्म संप्रदायाचा पुरस्कार करणाऱ्या प्रवृत्ती राष्ट्रीय पटलावर ठळक होत गेलेल्या दिसतात. धर्माचा आणि प्रादेशिक अस्मितेचा पुरस्कार करणाऱ्या राजकीय शक्ती नंतरच्या काळात प्रबळ आणि

**गेल्या सव्वीस वर्षांत काव्यप्रकार आणि रचनाप्रकाराच्या पातळीवरती काही महत्त्वाचे काम झालेले आढळत नाही. किंबहुना छंद, गेयता, लोकलयी, अलंकार या सगळ्यांपासून दूर जात मराठी कविता गद्यप्राय होत गेली. त्याचा एक अनिष्ट परिणाम असा की, तिने आपला वाचक आणि श्रोता गमावला. नारायण सुर्वे, करंदीकर, पाडगावकर, महानोर यांना ऐकण्यासाठी उत्सुक असलेला श्रोता पुढील काळात मंडपात दिसेनासा झाला. नव्या कवींनी आपला श्रोता अद्यापही तयार केलेला नाही आणि कविता वाचन ऐकण्यासाठी आलेल्या मंडळींतील बहुतेक लोक कविता नव्हे तर गाणी आणि विनोद ऐकण्यासाठी आलेले असतात हे वर्तमान चित्र आहे. मंचीय कवी नकलाकारांमध्ये बदलत जात आहे असे केविलवाणे दृश्य आज पाहायला मिळते.**

अधिकाधिक प्रबळ होत गेल्याचे जाणवते. गॅट करार, डंकेल प्रस्ताव, जागतिकीकरण- खाजगीकरण- उदारीकरण या क्रांतिकारी आर्थिक कृतींचा ठळक परिणाम जाणवायला एक दशक जावे लागले. तोपर्यंत विशिष्ट मताच्या राजकीय शक्तींनी राज्य व राष्ट्रातील महत्त्वाची सत्तास्थाने स्वतःकडे अंकित केली होती. चळवळ हाच ज्यांचा पाया आहे, अशा डाव्या प्रबोधन परिवर्तनवादी राजकीय विचारधारा या काळात आपला प्रभाव अबाधित ठेवू शकल्या नाहीत आणि परिणामी त्यांचा जनाधार हळूहळू कमकुवत होत गेला, चळवळींचा अंत झाला, विशिष्ट बुद्धिवंत वर्ग यांच्यातच केवळ 'सामान्य माणसाची' बाजू म्हणून परिवर्तनवादी विचारधारा शिल्लक राहिली. आर्थिक बदलांचे असे काही परिणाम झाले की बाजार आणि पैसा हा जीवनाच्या केंद्रस्थानी आला आणि बहुतेक आदर्श परिघाकडे सरकत गेले. पैसा हेच मूल्य झाले. पैसा हीच गुणवत्ता झाली. भौतिक बदल आणि डोळे दिपवणारा चकचकाट विकास म्हणवला गेला.

या काळाच्या काही वर्षे अगोदर दुसरी एक क्रांतिकारी घटना घडली होती, ती म्हणजे 'मंडल आयोगाची' अंमलबजावणी. तत्कालीन व्ही. पी. सिंह सरकारने घेतलेल्या या निर्णयामुळे देशातील खूप मोठा जनसमूह हा मुख्य प्रवाहात येण्यास मदत झाली. इतर मागास गटातील नवे नेतृत्व सामाजिक-राजकीय क्षेत्रात उदयाला आले आणि स्थिर झाले. परिणामी वर्षानुवर्षे सत्तेपासून दूर असणाऱ्या वर्गाचा राजकीय पटलावर दबदबा निर्माण झाला. नव्वदोत्तरी सामाजिक घडामोडींवर याचा परिणाम होणे साहजिक होते.

विद्यापीठाचे नामांतर, बाबरी मशिदीचे पतन, गुजरातचा नरसंहार, महाराष्ट्र, गुजरात व इतर ठिकाणी झालेले भूकंप, कारगिलचे युद्ध, प्रादेशिक पक्षांना गावपातळीपासून देशपातळीपर्यंत सत्ताकारणात मिळालेले यश, शेतकऱ्यांच्या आत्महत्या, गावोगावी पोहोचलेला टीव्ही, दूरचित्रवाणीचे असंख्य चॅनल्स, कॅसेट सीडी ते पेनड्राइव्ह हा मनोरंजन जगाचा झालेला प्रवास, पाचवा-सहावा-सातवा वेतन आयोग, शिक्षण क्षेत्रातील अभूतपूर्व बदल, कॉर्पोरेट जगताचे वाढलेले वजन, मोबाईल, इंटरनेट, विविध मनोरंजनांच्या साधनांची व दळणवळणाच्या साधनांची मोठी उपलब्धी, जातकेंद्री विचारांचे वाढते प्राबल्य, टू जी- थ्री जी- फोर जी, झपाट्याने झालेले शहरीकरण या सगळ्यांचे आमूलाग्र परिणाम सामाजिक, कौटुंबिक आणि वैयक्तिक जीवनावरती झाले. चंगळवाद आम झाला. सुखसुविधा आणि चैन यांतील अंतर लुप्त झाले. दुसऱ्या बाजूला असे दिसते की दलित, पददलित आणि आदिवासी हे हळूहळू मुख्य धारेकडे ओढले गेले. शिक्षणाचे प्रमाण वाढले तसेच बेरोजगारीचेही प्रमाण वाढले.

सामाजिक बदल हे सहज साध्या शब्दात मांडता येत नाहीत आणि त्याची कारणमीमांसा करण्यासाठी खूप साऱ्या उलथापालथी लक्षात घ्याव्या लागतात. नव्वदनंतरचे भारतीय जगणे असे जटिल होत जात असताना कवितेने या जीवनाला समांतर असणे हे क्रमप्राप्त होते आणि ती तशी राहिलेली आहे, हे मराठी कवितेचा आलेख पाहताना ध्यानात येते.

स्वातंत्र्यपूर्व कालखंडातच ज्यांनी मराठी कवितेत आपले अढळ स्थान निर्माण केले होते, असे काही कवी १९९० च्या नंतरही लिहीत होते. उदाहरणार्थ कुसुमाग्रजांची 'स्वातंत्र्यदेवतेची विनवणी' ही महत्त्वाची कविता १९९० नंतरच्या कालखंडात लिहिली गेली आहे. साठोत्तरी कवितेला वळण लावणाऱ्या कवींचा या काळातही दबदबा राहिला आहे. उदाहरणार्थ विंदा करंदीकरांना 'अष्टदर्शने'च्या पार्श्वभूमीवर मिळालेले ज्ञानपीठ आणि दिलीप पुरुषोत्तम चित्रे (एकूण कविता १), पानझड (ना. धों. महानोर), अरुण कोलटकर (भिजकी वही), वसंत आबाजी डहाके (चित्रलिपी) यांना कवितेसाठी मिळालेला साहित्य अकादमीचा पुरस्कार. कवी ग्रेस, सतीश काळसेकर यांचीही नावे या यादीत जोडता येतील. अखिल भारतीय साहित्य संमेलन हा मराठी साहित्यातील एक महत्त्वाचा उत्सव असतो. त्याचे अध्यक्ष हे सामान्यांच्या आकर्षणाचे केंद्र असतात. १९९० नंतर नारायण सुर्वे, शांता शेळके, वसंत बापट, केशव मेश्राम, वसंत आबाजी डहाके, फ. मुं. शिंदे आणि आनंद यादव, नागनाथ कोत्तापल्ले या १९६०-७० नंतरच्या कवींना ही अध्यक्षपदे लाभली. मंगेश पाडगावकर आणि वसंत दत्तात्रेय गुर्जर असे काही कवी विविध कारणांमुळे या काळात चर्चेत राहिले. सत्तरीनंतरच्या काळातील कवी भालचंद्र नेमाडे यांची 'मेलडी' व 'देखणी'तील कविता ही मराठीतील महत्त्वाची कविता आहे. अलीकडच्या काळात त्यांनाही ज्ञानपीठ मिळाले, त्यामुळे नेमाडेंच्या कादंबरी व समीक्षेसोबत ही कविताही काही काळ चर्चेला आली.

## मराठी कवितेतील समाजबदलांचे प्रतिबिंब

हा सगळा निर्देश करण्याचे कारण असे, की साठ-सत्तरच्या दशकात ज्यांचे संग्रह आले, ते बहुतेक कवी १९९० नंतरच्या काळात लिहीत होते, चर्चेत होते आणि २००० पर्यंतची खूप मोठी कविता त्यांच्या अनुकरणात अडकलेली होती.



अनुक्रमणिका

२०१६ साली मात्र हे चित्र किंचित बदलले आहे. एकतर ज्यांचा जन्म १९९०च्या मागेपुढे झाला आहे, असे कवीही आता विविध प्रसार-प्रचार माध्यमांमुळे आणि त्यांच्या कवितेमुळे सामान्य वाचकांपर्यंत पोहोचले आहेत. साठोत्तरी पिढीचा दबदबा संपुष्टात आला आहे. १९८० नंतरच्या पिढीने कवितेला फारसे काही दिले नव्हते. 'कविता दशकाची' मधील कवींची कविता महत्त्वपूर्ण होती, तरी ती सामान्यांपर्यंत पोहोचू शकली नाही आणि जे कवी सामान्यांपर्यंत जाऊ इच्छित होते, त्यांनी आपली कविता टाळ्या आणि हशा मिळवण्यासाठी गमावली. नंतर नंतर त्यांच्या हाती काही किस्से आणि पुरुषप्रधान विनोदाशिवाय काहीही उरले नाही. ग्रामीण कवींना गेयता जवळची वाटल्याने त्यांच्या रचना कविता कमी गाणी जास्त झाल्या. (अर्थात अलीकडे 'गाव व्हिलेज झालंय'सारख्या कविता सादरीकरणाच्या कार्यक्रमातून गंभीर व सामाजिक बदलांची नोंद घेणारी कविता मंचावरून ऐकवली जात आहे ही चांगली बाब आहे.) दलित कवींनी आक्रोश व विद्रोहाचे साठोत्तरी सूत्र अद्यापही पकडून ठेवलेले आहे, मात्र जागतिकीकरणाला केंद्रबिंदू मानून पुढे येऊ लागलेल्या आंबेडकरी कवितेने अभिव्यक्तीच्या नव्या नव्या शक्यतांचा विचार करणे गरजेचे आहे. एक स्वतंत्र प्रवाह म्हणून अदिवासी कविता या काळात प्रस्थापित झाली, आदिवासी कवितेला मूळ भारतीय अंगाने विकसित करता येणे शक्य आहे, तथापि भुजंग मेश्राम, प्रभु राजगडकर, विनायक तुमराम, विनोद लोहकरे, विनोद कुमरे हेच चार-सहा कवी उल्लेखनीय ठरतात. मराठी कवितेत एखादी निर्मला पुतुल का निर्माण होत नाही, हा प्रश्नही महत्त्वाचा वाटतो.

गेल्या सव्वीस वर्षांत काव्यप्रकार आणि रचनाप्रकाराच्या पातळीवरती काही महत्त्वाचे काम झालेले आढळत नाही. किंबहुना छंद, गेयता, लोकलयी, अलंकार या सगळ्यांपासून दूर जात मराठी कविता गद्यप्राय होत गेली. त्याचा एक अनिष्ट परिणाम असा की, तिने आपला वाचक आणि श्रोता गमावला. नारायण सुर्वे, करंदीकर, पाडगावकर, महानोर यांना ऐकण्यासाठी उत्सुक असलेला श्रोता पुढील काळात मंडपात दिसेनासा झाला. नव्या कवींनी आपला श्रोता अद्यापही तयार केलेला नाही आणि कविता वाचन ऐकण्यासाठी आलेल्या मंडळीतील बहुतेक लोक कविता नव्हे तर गाणी आणि विनोद ऐकण्यासाठी आलेले असतात हे वर्तमान चित्र आहे. मंचीय कवी नकलाकारांमध्ये बदलत जात आहे असे केविलवाणे दृश्य आज पाहायला मिळते.

पाडगावकरांची 'बोलगाणी', चंद्रशेखर गोखलेंच्या 'चारोळ्या', सुरेश भटांची 'गजल', कुणाकुणाची 'विडंबने', 'वात्रटिका', 'अभंग', महानोर - विठ्ठल वाघांची 'ग्रामीण कविता', सत्तरीनंतरची क्रांतिकारी 'दलित कविता' यांचेच भ्रष्ट आणि सुमार अनुकरण या काळात टप्प्याटप्प्यावर पाहायला मिळते. त्यामुळे कवितेचे पीक उदंड येऊनही हाती फारसे काही लागत नाही. या काळात एकाही नव्या काव्यप्रकाराची निर्मिती झालेली नाही, हेही लक्षात घ्यावे लागते.

ग्रामीण, दलित, आदिवासी, भटके-विमुक्त अशा अभ्यासाच्या सोयीसाठी केलेल्या फुटपट्ट्या कवींनी स्वतःच्या कपाळावर कुंकवासारख्या मिरवायला सुरुवात केल्याने फारच गोंधळाची स्थिती उत्पन्न झाली. अगोदर ज्येष्ठांचे अनुकरण करणारे कवी नंतरच्या काळात स्वतःचेच अनुकरण करत सुटले. या काळात एकूणच मराठी कवितेचा चेहरा सपाट झाला आहे. कवीची स्वतंत्र नाममुद्रा कवितेवरती उमटताना दिसत नाही. इतर कवींपेक्षा असलेले त्याचे अभिव्यक्तीचे व भाषेचे वेगळेपण सांगणे कठीण होऊन बसले आहे, इतकी ती सारख्या चेहऱ्याची झाली आहे. चांगली निसर्गकविता, चांगली भावकविता वाचायला मिळणे या कालखंडात अवघड होऊन बसले आहे. किंबहुना अशी कविता लिहिणाऱ्या कवींची संख्या बोटावरती मोजण्याइतकी कमी झाली आहे. नलेश पाटलांच्या नंतर आता असे कवी शोधणे जिकिरीचे झाले आहे.

बालकवितेचा निर्देश करणे अप्रस्तुत असले तरी तो करावा असे वाटते. 'नव्वदोत्तरी' या विशेषणाचे भले बुरे गुणधर्म आजही बालकवितेत पाहायला मिळत नाहीत. तिची क्षितिजे तिथेच आहेत, जिथे ती सत्तर ऐंशीच्या दशकात होती. विंदा करंदीकरांनी ज्या उंचीवरती मराठी बालकविता नेऊन ठेवली, ती उंची नंतरच्यांना गाठता आली नाही. मुलांना ऐकवण्यासाठी आमच्याकडे अजूनही तीच गाणी आहेत, जी ऐकत सत्तरच्या काळात जन्मलेली पिढी मोठी झाली.

लहान मुलांच्या पुस्तकांच्या संदर्भात झालेला बदल बाह्य आणि वरवरचा आहे. रंगीत छपाई, गुळगुळीत कागद, मोठा फॉन्ट, आकर्षक रंगसंगती आणि मोहक चित्रे यांच्या आड कवितेचा दर्जा फारसा विचारात घेतला जात नाही. इंद्रजित भालेराव (गावाकडे चल माझ्या दोस्ता), आबा महाजन (मन्हा गाव), ज्ञानदा असोलकर (पाऊस माझा साथीदार), कविताकोश (संपादक- विजया वाड) अशा काही चांगल्या कवितासंग्रहांचा निर्देश करणेही गरजेचे आहे. अनंत भावे, महावीर जोंधळे, उत्तम कोळगावकर, जनार्दन देवरे, सुरेश सावंत, एकनाथ आव्हाड, अशोक पाटील, माधुरी माटे यांनी या काळात बालकविता समृद्ध केली आहे. सृजनपंख (स्वाती काटे), दप्तरातील कविता (तृप्ती अंधारे), शाळकरी मुलांच्या

> **मराठी वाङ्मयीन नियतकालिकांची अवस्था फारशी चांगली नाही. त्यांच्या वाचकांची व आजीव वर्गणीदारांची संख्या दिवसेंदिवस कमी होत जात आहे. इतर व्यावसायिक नियतकालिकांना कविता पानपुरके म्हणूनही नको आहे. दैनिकांच्या रविवारच्या पुरवण्यातून ती २००० नंतर हद्दपार झाली होती, आता २०१६ चे दिवाळी अंक चळले तरी अनेक महत्त्वाचे अंक कविता विभागाशिवाय प्रकाशित झाले आहेत असे दिसेल. मराठीतील ९९% प्रकाशन संस्था ह्या कवी-लेखकांकडून पैसे घेऊन पुस्तके छापतात आणि जे असा व्यवहार करत नाहीत, त्या १% टक्का प्रकाशकांनी विशिष्ट परिघाबाहेरची व लेखकांशिवाय पुस्तके छापलेली नाहीत, असेही दिसेल. वितरकांना ८०% कमीशन हवे असते आणि ते दिल्यानंतरही वितरक कवितेच्या पुस्तकांना हात लावत नाहीत. पुस्तक प्रकाशन समारंभात लोक २०० रुपयांचा हार, शाल लेखक-कवीला भेट देतील पण जाताना त्याचे ५० रुपयांचे पुस्तक विकत घेत नाहीत, ज्यांना भेट म्हणून दिले आहे ते वाचत नाहीत, ही दृश्ये समकाळातील कवितेबद्दल अनेक बाबी सुचवतात.**

कविता (दयासागर वन्ने) अशा काही संकलनातून मुलांची कविता प्रकाशात आली ही त्यातल्या त्यात आनंदाची घटना आहे.

कविता आणि ग्रंथ प्रकाशनाची हाताशी असणारी साधने यांचा आणि प्रत्यक्ष निर्मिती यांचाही जवळचा संबंध दाखवता येईल. वाङ्मयीन नियतकालिके, वर्तमानपत्राच्या पुरवण्या, दिवाळी अंक, इंटरनेटवरील ब्लॉग, फेसबुक वॉल, व्हॉटस्अॅप ग्रुप यांचे महत्व प्रकाशन संस्थांइतकेच आहे. किंबहुना ई-बुक आणि किंडलच्या ऑनलाईन युगात मुद्रित पुस्तकांचे वर्चस्व कमी होण्याची चिन्हे आहेत. मराठी पुस्तकांच्या १००० प्रतींच्या आवृत्त्या आता ५०० पर्यंत खाली आल्या आहेत, हे विसरता येणार नाही. कवितासंग्रह प्रकाशित करण्याची हौस वाढली असली आणि वर्षाला पाचशे सातशे कवितासंग्रह प्रकाशित होत असले तरी 'प्रिंट ऑन डिमांड' च्या सोईमुळे एका आवृत्तीतील प्रत्यक्ष प्रतींची संख्या आगामी काळात कमी कमी होत जाईल.

'नव्वदोत्तरी कविता' हा शब्दप्रयोग करण्याचे श्रेय साठोत्तरी लघुनियतकालिकांचे अपत्य असणाऱ्या नव्वदोत्तरी लघुनियतकालिकांना द्यावे लागेल. 'कवितारती', 'अनुष्टुभ', 'अस्मितादर्श', 'पंचधारा', 'प्रतिष्ठान', 'साहित्य', 'युगवाणी', 'अक्षरवैदर्भी', 'साक्षात' या नियतकालिकांइतकेच 'शब्दवेध', 'अभिदा', 'अभिदानंतर', 'खेळ', 'ऐवजी', 'काव्याग्रह', 'अनाघ्रात', 'नवाक्षर दर्शन' या नव्वदोत्तरी लघुनियतकालिकांना द्यावे लागेल. 'अभिदा' आणि 'अभिदानंतर' या नियतकालिकांनी 'नव्वदोत्तरी' हा शब्दप्रयोग वापरायला सुरुवात केली आणि एक संकल्पना म्हणून 'नव्वदोत्तरी' तत्त्वज्ञानाची व मूल्यव्यूहाचीही मांडणी केली. श्रीधर तिळवे यांची समीक्षा, हेमंत दिवटे, दा. गो. काळे, मंगेश नारायण काळे, प्रवीण बांदेकर, विष्णु जोशी यांच्या संपादकीय भूमिका आणि अरुण काळे, भुजंग मेश्राम, गणेश विसपुते, निरजा, प्रफुल्ल शिलेदार, प्रज्ञा दया पवार, रमेश इंगळे उत्रादकर, रवींद्र इंगळे चावरेकर, प्रवीण बांदेकर, हेमंत दिवटे, श्रीकांत देशमुख, मनोहर जाधव, लोकनाथ यशवंत, अजीम नवाज राही, वर्जेश ईश्वरलाल सोलंकी, वीरधवल परब, नितीन रिंढे, अनिल धाकू कांबळी, अजय कांडर, संतोष पद्माकर पवार, पी विठ्ठल, बालाजी मदन इंगळे, कल्पना दुधाळ, बालिका ज्ञानदेव, कविता महाजन, श्रीधर नांदेडकर, दिनकर मनवर, मनोज पाठक, मंगेश नारायण काळे, अभय दाणी, केशव सखाराम देशमुख, रवी कोरडे, बालाजी सुतार, मंदाकिनी पाटील, कैलास दौंड, विनोद कुमरे, ऐश्वर्य पाटेकर, वीरा राठोड, अजित अभंग, प्रणव सखदेव, सत्यपाल आधारसिंह राजपूत, पृथ्वीराज तौर, संजीव खांडेकर, सचिन केतकर, अनिल साबळे, फेलीक्स डिसोजा, सुदाम राठोड, इग्रेशियस डायस, प्रतिक पुरी, विनायक येवले, नामदेव कोळी, सुनील अभिमान अवचार, शर्मिष्ठा भोसले, विष्णु जोशी, वैभव छाया आर्दोच्या कवितेने हा 'नव्वदोत्तरी' अवकाश विस्तारत नेला आहे. आजची मराठी कविता म्हणू किंवा नव्वदोत्तरी मराठी कविता म्हणू, ती या कवींनी व्यापलेली आहे. नामदेव कोळींनी २०१६मध्ये संपादित केलेला 'वाघूर' दिवाळी अंक, बाळासाहेब घोंगडे यांच्या 'अक्षरपेरणी'चा २०१५ चा दिवाळी अंक, 'खेळ', 'अभिदानंतर', 'काव्याग्रह'चे अंक चाळले तरी १९९०नंतरच्या कवितेचा लंबक सहज लक्षात येतो. महानगरी- ग्रामीण- दलित- भटके आदिवासी मुस्लीम- स्त्रीवादी अशा भिन्न भिन्न प्रवाहातील या कवींच्या कवितेमध्ये 'खाउजा'च्या विविधांगांचे सूक्ष्मातिसूक्ष्म पापुद्रे सोलण्याचा

प्रयास दिसतो. एकाच वेळी अत्यंत व्यक्तिनिष्ठ आणि त्याच वेळी टोकाची सामाजिक कविता या कवींनी लिहिली आहे. कारण हे कवी ज्या व्यक्तीबद्दल लिहितात-बोलतात, ती एका व्यापक अशा समाजवास्तवाचा भाग आहे. त्याचे आत्मकेंद्री असणे हाही सामाजिक घडामोडींचा परिणाम आहे. त्याचे एकटेपण, त्याचे भ्याडपण, त्याचा आक्रस्ताळेपणा, त्याचे स्वतःविषयी चाललेले उत्खनन आणि जागतिक बदलांना त्याने दिलेल्या संयत असयुक्तिक प्रतिक्रिया सामाजिकच आहेत. तो ज्या काळात जगत आहे, त्यातील शंभरातील नव्याण्णवांचे प्रतिनिधित्व तो करत आहे. तो आपुलकीच्या नात्यांपासून तुटलेला आहे. आपल्या एकटेपणाची जाणीव झाल्यामुळे तो प्रचंड भ्यालेला व हतबल आहे आणि ही हतबलता लपवण्यासाठी तो स्वतःला आभासी जगात गुंतवून ठेवताना दिसतो. जिथे मूल्यांचा गोंधळ निर्माण झाला आहे, अशा एका बिंदूवर तो उभा आहे. आणि हा बिंदू नव्वदोत्तरी कवितेतून पुन्हा पुन्हा आविष्कृत होत राहिलेला आहे.

विविध जाणिवांचे उल्लेख करत राहूनही आणि ही कविता लोकप्रिय नाही किंबहुना शंभरातील नव्याण्णवांना आपली वाटत नाही, हेही नोंदवणे गरजेचे वाटते. त्याची काही कारणे संभवतात. एकतर लोकप्रियता हा शब्द शिवीसारखा आपल्याकडे वापरला जातो, लोकप्रिय आहे म्हणजे काही गुन्हा केलेला आहे असा भाव सतत बिंबवला गेला आहे, दुसरे असे की, साहित्य हा केवळ मनोरंजन करणारा कलाप्रकार नाही हे विंबवण्यासाठी आणि वाचक-श्रोत्यांची अभिरुची समृद्ध करण्यासाठी फारसे प्रयत्न होताना दिसत नाहीत. त्यामुळे साहित्याच्या क्षेत्रात थोर असणाऱ्या चित्रे-कोलटकर- पाध्ये अशा मंडळींची नावेही सामान्य माणसाला ठाऊक असत नाहीत. आपण लिहितो ते कुणासाठी? याचा विचार लेखक-कवींनी करायला नको का? आपल्याला सवंग व्हायचे नाही तर सवंग अभिरुचीला समृद्ध करण्यासाठी अभिजात लेखक कवींनी कोणती पावले उचलली, या प्रश्नाचे उत्तर त्यांनी द्यायला हवे. नाहीतर आजूबाजूची लोकसंख्या वाढत जाताना पुस्तकाच्या प्रतींची संख्या अशीच घटत जाईल.

मराठी वाङ्मयीन नियतकालिकांची अवस्था फारशी चांगली नाही. त्यांच्या वाचकांची व आजीव वर्गणीदारांची संख्या दिवसेंदिवस कमी होत जात आहे. इतर व्यावसायिक नियतकालिकांना कविता पानपुरके म्हणूनही नको आहे. दैनिकांच्या रविवारच्या पुरवण्यांतून ती २००० नंतर हद्दपार झाली होती, आता २०१६ चे दिवाळी अंक चाळले तरी अनेक महत्त्वाचे अंक कविता विभागाशिवाय प्रकाशित झाले आहेत असे दिसेल. मराठीतील ९९% प्रकाशन संस्था ह्या कवी-लेखकांकडून पैसे घेऊन पुस्तके छापतात आणि जे असा व्यवहार करत नाहीत, त्या १% टक्का प्रकाशकांनी विशिष्ट परिघाबाहेरची व लेखकांशिवाय पुस्तके छापलेली नाहीत असेही दिसेल. वितरकांना ८०% कमीशन हवे असते आणि ते दिल्यानंतरही वितरक कवितेच्या पुस्तकांना हात लावत नाहीत. पुस्तक प्रकाशन समारंभात लोक २०० रुपयांचा हार, शाल लेखक कवीला भेट देतील पण जाताना त्याचे ५० रुपयांचे पुस्तक विकत घेत नाहीत, ज्यांना भेट म्हणून दिले आहे ते वाचत नाहीत, ही दृश्ये समकाळातील कवितेबद्दल अनेक बाबी सुचवतात.

या पार्श्वभूमीवर इंटरनेटवरील ब्लॉग, फेसबुकची वॉल आणि व्हाटस्ॲप चे ग्रुप या काळातील लेखक-कवींना आपले वाटत आहेत. कविता आणि काव्यचर्चा यांना वाहिलेले शेकडो छोटे छोटे गट व्हाटस्ॲप, फेसबुकवरती उपलब्ध आहेत. गंभीर काव्यचर्चेसाठी हे गट निरुपयोगी असले तरी संवादाची आणि वादासाठीचीही महत्त्वाची जागा म्हणून व्हॉटस्ॲप, फेसबुककडे पाहता येईल. आवडलेल्या कविता शेअर करून पुढे पुढे पाठवत जाणारे वाचक पाहिले की त्यांना कविता समजत नाही, असे कसे म्हणता येईल?

अगदी प्रारंभी म्हटल्याप्रमाणे कोणतीही कलाकृती आणि व्यक्तीदेखील तिच्या काळाचे-स्थळाचे अपत्य असते. स्थलकालातीत होण्याची बीजे त्याच्या या अवकाशातच असतात. समकालीन समाज जर इन्स्टंटला प्राधान्य देणारा असेल तर बहुतेकांची कविता इन्स्टंट फुड सारखी होत जाणारच. चायनीज बाजारातील वस्तूंप्रमाणे तीही अल्पकाळ टिकणारी, चमकोगिरी करणारी आणि पैसा फेकताच उपलब्ध होणारी, ग्राहकानुनय करणारी असणारच. चांगली, श्रेष्ठ, कालातीत कविता अशी असणार नाही, हेही तेवढेच खरे आहे. १९९०नंतरची कोणती कविता ही बाजारातील चिनी बनावटीच्या वस्तूंप्रमाणे आहे आणि कोणती कालातीत आहे, हे ठरवण्यासाठी काही काळ वाट पाहावी लागेल. १९९० नंतरच्या कवितेचे तत्त्वज्ञान आणि तिची रचना यांचे महत्त्वमापन तेव्हाच करता येईल.

●

प्रा. विद्या सुर्वे-बोरसे,
मराठी विभाग,
महाराजा सयाजीराव गायकवाड महाविद्यालय,
मालेगाव, जिल्हा नाशिक.
चलभाष : ९४०५५४७००२

पुस्तक परीक्षण

प्रा. संतोष गोनबरे

# आबूट घेऱ्यातला सूर्य
# मानवतावाद मुखर करणारी कविता

बऱ्याच दिवसांनी एकाच बैठकीत वाचून संपवावा, असा कवी अरुण इंगवले यांचा कवितासंग्रह हाती पडला. हल्लीच्या विशविशीत साहित्य-बांधणीत असं ठाशीव व बांधेसूद सौष्ठव असलेला हा विरळा आणि अल्पाक्षरी देखणा संग्रह हाती खेळवताना मनःपूत उत्तेजना अंगभर लहरत राहिली. ही उत्तेजना जितकी समाधानाची होती, तितकीच विदारकपणे अंगावर येणारीही होती. 'आबूट घेऱ्यातला सूर्य' असं वेगळं सूचन करणारं नाव घेऊन निर्मिलेला ब्याण्णव कवितांचा हा चिंतन-विचारांचा काव्यघेरा आपली संवेदनशीलता अधिक विकसित करतो, यात शंका नाही. मुळात, 'आबूट' म्हणजे धुक्याचा थर. इंगवले हे कोकणातले. त्यातही चिपळूणचे. टाउन ह्या संकल्पनेच्या थोडेसे खाली आणि खेड्याच्या थोडे वर असलेले चिपळूण हे एक विकसनशील शहर. अशा खेडेवजा शहरात राहूनही कवी प्रवाहपतित न होता संयत विचारांद्वारे काव्यविश्वावर अमिट ठसा उमटवणारी कविता निर्माण करतो, जी नव्या जागतिक संदर्भांचा ठाव घेण्याचा आवाका बाळगते, हे विशेष!

साहित्यिक-सांस्कृतिक चळवळीतील हाडाचा कार्यकर्ता असणारा हा कवी डोळसपणे वर्तमानाचे व्यवच्छेदक निरीक्षण नोंदवतो आणि घुसमटीचा उन्हाळा थेट शब्दांतून व्यक्त करतो. कविता जगणं म्हणजे काय हे मांडताना-

*कुठेच नोंदला नाही*
*कवितेसाठी झुरून मेलेल्यांचा इतिहास*
किंवा
*पुन्हा मी कविता लिहीनच असंही नाही*
*मी नुसताच जगत राहीन कविता लिहिल्यासारखा*

असं जेव्हा कवी लिहितो, तेव्हा आपण जाणून घ्यावं की कविता हे साध्य नसून कवीचे साधन आहे. या भावनेने कविता लिहून अलिप्त होणारा हा अवलिया म्हणतो-

*कारण आत्ता शब्दकोश आपापल्या परीने लावतील*
*कवितेचा सोयीचा अर्थ*
*उमजणार नाही कोणालाच, आडव्या पिंडाची वेदना*

मार्टिन ल्यूथरच्या darkness never drive out darkness या निसर्गवृत्तीशी सहगम साधत only light can do that या आशावादाने हे आबूट घेऱ्याचे बुरखान हटून 'नक्की उजाडणार आहे' या निस्सिम आशावादासाठी प्रत्येक कवितेत कवीने स्वतःला इरेस घातले आहे. म्हणूनच ही कविता प्रादेशिक वाटता वाटता वैश्विक होऊन जाते आणि वैश्विक होताना मातीशीही इमान राखते. धर्म-पंथांच्या बुंध्याखाली एकच मानवतावादी भूमी आहे, हे कटू सत्य मांडताना, माणूसपणाच्या तत्त्वज्ञानाविषयी संकेताने बोलताना एक निखळ सत्य कवी मांडतो की-

*जमिनीवर वेगवेगळ्या बुंध्यावर*
*उभी असणारी ही झाडं*
*जमिनीखाली मात्र यांची मुळं एकमेकांत गुंतलेली*
*ही गुंतागुंत कोणाची? जातीची? धर्मश्रद्धेची?*
*की संपूर्ण व्यवस्थेची?*

आज माणूस जात, धर्मात आणि राजकारणात विभागला गेला आहे. स्वतःच्या सुख-दुःखांची कारणे दुसऱ्यामध्ये शोधून त्याच्यावर दोषारोप करण्यात धन्यता मानत आहे. गतकाळाच्या स्मृती जोपासत स्वतःला मात्र उद्ध्वस्त करत आहे. शहर असो वा गाव, जगणारा प्रत्येक अस्तित्वहीन कणा इतिहासाच्या पुसट खुणा जपू पाहत आहे. त्यातून त्याच्या इतिहासाची नवनिर्मिती होते का? कवीने ह्याचे उत्तर सरळ शब्दांत दिले आहे.

*इत्त्यासाचं आसंच आसतंय*
*आज्या, मनाला लावून घेवू नको*
*सातबाराच्या तुकड्यावर तुझी नोंद*
*हाच मोठा इत्त्यास*

हे व्यवस्थेचं पक्षपातीपण? की सैल जाणिवांनी शेकडो वर्षांच्या परंपरांचं प्रच्छन्न प्रारूप! अनादी काळापासून सडलेली जाती-धर्माची गठडी बांधून डंपिंग ग्राउंडवर नेऊन विल्हेवाट लावावी तर स्वतःला बुद्धिवादी म्हणवणारे या ना त्या तत्त्वघोषाने तीच धर्म-जात उगाळून श्रद्धेचं गंध भाळावर लावून घेतात; तेव्हा पुराण, इतिहास, तात्त्विक आणि वैज्ञानिक संदर्भाचं अफाट आकलन असणारा इंगवले यांच्यासारखा अष्टावधानी कवी जे चिंतन मांडतो, त्याची जातकुळी चाकोरीपेक्षा फारच वेगळी ठरते. आजच्या विपरीत वर्तमानात गर्दीने दिसणाऱ्या 'झिलकारी' साहित्यात म्हणूनच हा फटकळ संग्रह आपलं वेगळेपण अधोरेखित करतो. ही



अनुक्रमणिका



- आबूट घेऱ्यातला सूर्य
- अरुण इंगवले
- पद्मगंधा प्रकाशन, पुणे
- मूल्य : रु. १५०/-

'जिऽऽजिऽऽरंऽऽजि' करणारी झिलकारी कविता नक्कीच नाही. राज्यव्यवस्था, धर्मव्यवस्था, अर्थव्यवस्था यांच्याशी फटकून वागणारी अभिव्यक्ती अधोरेखित करणारी ही कविता आहे. खरे तर व्यवस्थेच्या विरोधात उभे राहणे हे कोणत्याही उत्तम साहित्यकृतीचे वा कलेचे प्रमुख कर्तव्यच ठरते. म्हणूनच समृद्ध परंपरांची बेऽऽवेऽऽ करणारी आणि स्थितीवादी असहाय व्यवस्थेबाबत कवी अलिप्तपणे लिहून जातो-

*बकरी नियमितपणे लालचुटूक ढिरीच्या मागावर*
*झाड असाहाय्य, रोजंदारीवर असल्यासारखे*

आणि त्याच वेळी शोषकांच्या पुढच्या पिढीबद्दल, त्यांच्या वाढत्या संख्येबद्दल आणि अमानुष भुकेबद्दल कवी शेरडांच्या प्रतिमेतून अतिशय प्रभावीपणे व्यक्त होतो. धर्माचे जंजाळ रूप प्रत्येकाला कवेत घेत असताना कवीचं मन सदोदित आक्रंदत राहतं आणि निडरपणे आपल्या भावनाही व्यक्त करतं.

*पडीच्या बेवारस ढोरासारखा*
*आम्ही धर्मांधर्मात वाटून घेतलाय जगन्नियंता*
*त्याच्या बोट्या केल्या जाती जातीत वाटण्यासाठी*

यासाठी मनाचं प्रचंड धाडस लागतं आणि विचारांची सम्यक बुद्धी! कवीकडे ती निश्चितच आहे. कारण कोणताही विलाप वा आक्रस्ताळेपणा न करता तुकारामाचाच बंडखोर स्वर आजच्या वर्तमानात कवी उच्चारतो आणि आम्ही आत्ता 'पालखीचे भोई' होणार नाही, हेही ठासून सांगतो. 'खांदेकरी' ह्या कवितेत-

*मला हवेत चार महामानव*
*राज्यघटनेचा जयघोष करणारे*
*धर्माचा पत्ता माहीत नसणारे*
*माणूस म्हणून जगणारे*
*तिरडी उचलीन म्हणतो सगळ्या म्हातारड्या धर्माची*

असं धारिष्ट्य दाखवून आउटडेटेड धर्माचं मडकं घेऊन चालू पाहणारा हा कवी समविचारांना तिरडीचे खांदेकरी होण्याचं आवाहन करतो आणि बऱ्याचदा अपेक्षाभंगाने निराशही होतो. कारण धर्म-जात-पोटजात विसर्जित करून आपण सारे एकाच अमिबाचे वारस आहोत, हे कवीला ठासून सांगायचंय. पण समाजभयाच्या दडपणात, श्रद्धेच्या दोरखंडात आज जो-तो करकचला आहे. कवी इंगवले श्रद्धेचा गंडा बांधायला तयार नाहीत. कारण त्यांना स्वर्गवासी, कैलासवासी, वैकुंठवासी ह्या उठाठेवीच मंजूर नाहीत.

ज्ञानेश्वर, तुकाराम, कबीर, गांधी, डॉ. आंबेडकर अशा अनेक महामानवांच्या विचारांचा वेध इंगवले यांची कविता घेते. त्यांच्या अनुयायांनी केलेल्या त्यांच्या विचारांचा पराभव आणि वरवरचं अनुकरण यावर या संग्रहात परखड भाष्य करण्यात आलं आहे. बाबासाहेबांबद्दलच्या विचारांना तर वेगळीच धार जाणवते. 'महामानवा' कवितेत कवी म्हणतो-

*मानवतेसाठी लढणाऱ्या महायोद्ध्या*
*पराभूत झालास तू तुझा जयजयकार करणाऱ्यांकडून*
*महामानवा, तुला अनुयायी लाभलेच नाहीत*
*लाभले फक्त दलाल*
*जे तुला भांडवलासारखं वापरून सौदे करतात*

जात हा सर्वांसाठी सदोदित कळीचाच मुद्दा ठरत आला आहे. स्वातंत्र्य आणि समता सोडून लोक जाती आणि पोटजातींना उराउरी कवटाळतात. त्यामुळेच कदाचित अस्वस्थ वर्तमान जगणाऱ्या प्रत्येकातील माणूस 'जातभाई होण्याआधी' कळवळून पोडतिडकीने प्रश्न विचारत राहतो की-

*कसल्या तेलाने थापली गेली माझी लिबलिबीत टाळू*
*कधी भरले गेले जाती-धर्माचे रकाने*

त्याचे उत्तरही त्याला मिळत असावे, कारण जात आली की जातींचे देव येतात, जातीची विचारधारा येते, परंपरा आणि इतिहासाचा सलही काळजात उतरतो. जात म्हणजे नक्की काय हे कळण्याआधीच जातीचा दुराभिमान रक्तात झिरपतो आणि आपण 'जातभाई' ठरतो. कवीने ह्याचे सरळ उत्तर देण्याचा प्रयत्न केला आहे.

*बापाच्या वीर्यासोबतच*
*रुजत घातली गेली नसेल ना जात गर्भाशयात?*

अशा वेळी हा राग व्यवस्थेवर व्यक्त करताना जात कुठे-कुठे शोधायची? मात्र सॅम्यूअल बेकेट म्हणतो त्याप्रमाणे मुकेपणा कुठे राखावा, याचाही विचार व्हायला हवा. नाही तर silence will kill the kind.

समाजाच्या परंपरागत गावगाड्याची अलुतेदार-बलुतेदार पद्धत यंत्रयुगाच्या प्रभावाखाली संपुष्टात आली आणि खेडी नागरीकरणाकडे वाटचाल करत असताना 'भिक्या, बावीया काठावर, कोळीष्टक, फामली'सारख्या कविता आपल्या ओसाड गावगाड्याची व्यथा बोलत तगमगीला वाट करून देत या संग्रहात उतरल्या आहेत. पोरांना खायला मिळावं म्हणून भिक्या दारूच्या नशेत काळोखाच्या अंथरुणात उपाशी झोपतो. आजा मेल्यावर विहीर बुजली, ओकतीच्या खुणा



अनुक्रमणिका

पुसल्या गेल्या आणि बावीचा काठ आठवणी घेऊन मात्र उभा आहे. लेकीचं लग्न झाल्यावर लक्ष्मीचं घंर कोळीष्टकांनी भरलं, कारण तिचं खोपटं हेच मुळी गावाला चिकटलेलं कोळीष्टक आहे. याचे तिला भान आहे. शिंद्याची मांगारीन 'पोसमेन येऊन गेला काय' याचा अदमास घेत राहते. तिच्या शेतीची रया गेली आणि नांगर भंगारात विकायची वेळ आली. हे सगळं सार्वत्रिक वास्तव ही कविता नेमकेपणाने पकडते. गावाच्या वेशीतून बाहेर पडलेले सुटकेचा श्वास घेत असतीलही, पण गावात राहिलेले आजच्या घडीला मातीत होरले जात आहेत आणि हे देशाच्या कोणत्याही प्रांतात सद्य:स्थितीत घडत आहे. दशकांमागून दशके सरली, पण अन्याय-अत्याचाराचं आवूट सरत नाहीये, हे कवीने सप्रमाण मांडले आहे.

The business of the poet is not to use ordinary emotions but express them with actually feelings असं इलिएट म्हणतो, जे या कवितांमधून प्रभावीपणे जाणवत राहतं. या कवितांचे वैशिष्ट्य असे की ही वैचारिक चिंतनगर्भ कविता असूनही रुक्ष, गद्यप्राय न होता ती आपले 'कवितापण' शेवटपर्यंत ढळू देत नाही. ह्यात अव्याहत निरीक्षणांच्या नोदी असल्या तरीही त्या कविता बनून येताना शब्दांच्या समाजाची घडी विस्कटणार तर नाही ना, याची प्रकर्षाने काळजी घेतात. कारण कदाचित एखादा शब्द दुमडला गेल्यास अर्थहीनतेचा फार मोठा धोका अशा कवितांसमोर असतो. त्यामुळेच कमीत-कमी शब्दप्रयोगांत भरगच्च आशय व्यक्त करणाऱ्या या कवितांची अल्पाक्षर रमणीयता वाखाणण्याजोगी आहे.

हाडाचा कवी असलेल्या या कवीला स्वतःचे कविपण जपायला आवडते. जे. मिडलमन यांनी म्हटल्याप्रमाणे कविता म्हणजे something communicated from poet to others, ही या कवीची जीवननिष्ठा असावी. We cannot write anything without any pain. कारण जीवनशोध आणि आत्मशोध हे साहित्यनिर्मितीचे मूलभूत प्रेरणास्रोत मानले तर त्या शोधामागील नेमकी जाणीव आसक्त मनाला कलाविश्वात घेऊन जाते आणि ती 'भाषा' बनून 'भावभावनांना व्यक्ततेच्या शक्यता उपलब्ध करून देते.'

स्वान्तःसुखाय वगैरे ढोंगबाजी न करता ही कविता समाजनिष्ठ असल्याचे स्वतःहूनच कुठेतरी मान्य करते. कारण literature has another man या उक्तीप्रमाणे ह्या संग्रहातील हरएक व्यक्तिरेखा आपापली बाजू मांडत सामोरी येते. मग कवी स्वतःच का त्या भूमिकेत असेना! 'सस्नेह भेट, अस्वस्थ येरझारा, 'कविता@जगणे.com', 'कविता लिहिल्यासारखा', 'कवितेची शेपटी' इत्यादी कविता वरवर पाहता व्यक्तिनिष्ठ वाटल्या तरी त्या प्रत्यक्षात समष्ठीनिष्ठ आहेत. 'गावपळण, बारकू, भिक्या, कोळीष्टक, अहेव स्वप्न, फामली, यंदा गणपती पाचच दिवसांचे किंवा खूप दिवसांनी परतलो तेव्हा' यांसारख्या कवितांमधून भावनिक गलबला कवी जेव्हा शब्दांत व्यक्त करतो, तेव्हा जाणवतं की इंगवले यांच्या परिसराच्या व्यथा-वेदनांचे प्रक्षेपण या कवितांनी स्वीकारले आहे. कोकणचं उद्ध्वस्तीकरण, आर्थिक परावलंबित्व, दारिद्र्य, प्रथा, कुलाचार अशा अनेक गोष्टी ही कविता मुखर करते.

या संग्रहात लख्ख प्रमाण मराठी आणि कवीच्या परिसरातील तिल्लोरी बोलीतील शब्द हातात हात घालून वावरतात. आपली वेगळी वाट निर्माण करण्याएवढे सामर्थ्य ह्या एकाच संग्रहात ओतणारा हा कवी अगदी पिंडी ते ब्रह्मांडी तत्त्वज्ञानाचा सहज संचार करतो. तुकाराम, ग्रेस, नारायण सुर्वे, दिलीप चित्रे, केशवसुत, विंदा, माधव अशा अनेक कवींच्या जातकुळींना प्रमाण मानणाऱ्या या कवीची साहित्याच्या कोणत्याही जातीत सामावून जाण्याची मात्र तयारी नाही, हेच त्यांच्या कवितेचे मोठेपण आहे. कवितेशी एकनिष्ठ असणारा हा कवी कवितेबद्दलचं नातं सांगताना म्हणतो -

*कविता कोण लागते माझी*
*हक्काने जागं करून*
*का सांगत राहते तिचे सल*
*अपरात्री उठून लिहावं वाटतंय*
*याचा अर्थ मी तिला जिवंत वाटत असणार*

ह्या संग्रहातील सर्वच कविता आशयघन आणि परिपूर्ण असून स्वनिष्ठेशी आणि काव्यनिष्ठेशी प्रामाणिक असणाऱ्या आहेत. 'बाब,र मूठभर सैन्य..., बकरी, रामराज्याच्या भाटांनो, इत्यासाचं आसंच आसतंय, नो एक्झिट, कोंबडा, समृद्ध परंपरा' इत्यादी कविता माईलस्टोन ठराव्यात.

सध्याचं आवूट घेऱ्यातलं वावरणं विरेल काय? हा समस्त मानवतेसमोरील वैश्विक प्रश्न ठरला आहे. कारण स्वतःच्या सावलीचीही भीती वाटावी अशा सैरभैर भवतालाच्या विज्ञानयुगात सुद्धा प्रतिगामित्व जपत माणूस जगत आहे. मात्र, criticism हा काहीही न बोलता, काहीही न करता आणि भूमिकाविहीन उच्चारता येत नाही. इथे तर या कवीची लेखणीच पूर्णतः रक्ताळ झाली आहे. एवढ्या ह्या भावना प्रखर, तीव्र आणि सच्च्या आहेत. म्हणूनच वर्तमानाचा मलूल अभ्रा दूर भिरकावून भविष्याचा चमकदार आशावाद या कवितांमधून उजागर होत राहतो -

*धीर राखायला हवा मळभाचं बुरखान फाटेपर्यंत*
*उन्हाची कात्रणं काढून ठेवायला हवीत*
*सूर्यबीज जपण्यासाठी...*

●

**प्रा. संतोष गोनबरे**
चलभाष : ९४२३२९१४८५
ई-मेल : sanvn3@gmail.com





अनुक्रमणिका

# औदुंबरचे अक्षरधाम

लेख

**वैजनाथ महाजन**

**महाराष्ट्रकवी यशवंत, पंडित महादेवशास्त्री जोशी, दुर्गा भागवत, पु. ल. देशपांडे, व्यंकटेश माडगूळकर, प्रा. राम शेवाळकर, नारायण सुर्वे, शंकर पाटील, शंकरराव खरात, काकासाहेब गाडगीळ आणि अनेक. प्रत्यक्ष साहित्यप्रेमी यशवंतराव चव्हाण हेसुद्धा या संमेलनात हजेरी लावून गेलेले दिसतात. त्यांना कवी सुधांशुंच्या या कामाबद्दल अपार आदर होता. इथल्या राजकारण्यांच्यात आजही कवींच्या बद्दल तसा आदर दिसतो आहे. हळूहळू औदुंबरचे संमेलन हे अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाला समांतर अशा पद्धतीनेच गणले जाऊ लागले. औदुंबरला झालेला अध्यक्ष भविष्यात अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचा अध्यक्ष होतो, असा समज या परिसरात रुजलेला आहे. येणाऱ्या मंडळींचा कान तयार झालेला आहे. त्यामुळे ते साहित्याचे नेणते जाणते बनलेले आहेत.**

औदुंबरसारख्या शब्दशः मुठीएवढ्या असलेल्या तीर्थक्षेत्राच्या ठायी दोन चार मुले आणि तीही शाळकरी एकत्र येतात आणि आपल्यातील वडील असलेल्या सदानंद सामंत या आपणास इंग्रजी साहित्याचा परिचय करून देणाऱ्या कोवळ्या तरुणाच्या नावाने 'सदानंद साहित्य संमेलन' सुरू करतात आणि हे सुरू केलेले संमेलन आज थेट पंच्याहत्तरी गाठत आहे. हा महाराष्ट्राच्या सांस्कृतिक जीवनातील एक अभूतपूर्व असा अक्षरयोग म्हणायला हवा. यात पुढे नावारूपाला आलेले कवी सुधांशु आणि त्यांचे जिव्हाळ्याचे मित्र, कथाकार म. भा. भोसले यांचा सर्वतोपरी पुढाकार, त्या पहिल्या संक्रांत संमेलनाला त्यांनी थेट दत्तो वामन पोतदार यांना पाचारण केले आणि महाराष्ट्राचे ते पुराणपुरुष संमेलन सुरू करण्याकरिता भिलवडी स्टेशनवर उतरून टांग्याने औदुंबर क्षेत्री अवतरले, तशी ही या चार घरांच्या चिमुकल्या गावातील मोठी अपूर्वाईचीच बाब. संध्याकाळी पारावर गप्पा सुरू व्हाव्यात तशा पद्धतीने संमेलन सुरू झाले. दत्तो वामन पोतदार यांनी मुलांच्या उपक्रमाचे कोडकौतुक केले आणि त्यांच्या पाठीवरून हातही फिरवला. मुलांची उमेद वाढली. आता आपल्याला अकाली सोडून गेलेल्या सदानंद सामंत यांच्या नावाने प्रतिवर्षी संक्रांती दिवशीच संमेलन घ्यायचे याचा इरादा पक्का झाला आणि औदुंबराच्या तरुतळी सदानंद साहित्य मंडळाचे 'सदानंद साहित्य संमेलन' जे सुरू झाले ते आजही अव्याहत सुरू आहे. तशी पंच्याहत्तर वर्षांची ही वाटचाल कोणत्याही साहित्यप्रेमी माणसास उभारी देणारी आणि त्याच्या साहित्यजीवनाच्या कक्षा रुंदावणारी अशी आहे. त्या काळात वाणी आणि त्या वाणीची श्रवणभक्ती याशिवाय दुसरी करमणूकच नसायची. पण ही करमणूक मनाला उन्नत करून ऊर्जा देणारी असल्याने ती चंद्राच्या कलेप्रमाणे वाढत गेली. आणि यातून औदुंबर क्षेत्री महानुभावांची मांदियाळीच प्रतिवर्षी लोटू लागली. परिसरातील हौशी मंडळी बैलगाड्या जुंपून आणि सायकली दामटत औदुंबर क्षेत्री येत. जीवाचा कान करून संमेलनाच्या अध्यक्षाचे भाषण ऐकत आणि एकमेकांना तिळगूळ देऊन घरी परतत. तसा हा अगदी साधा सरळ सांस्कृतिक सण. पण कवी सुधांशु आणि म.भा. भोसले यांची तळमळ दाद देण्यासारखी असल्यामुळे त्यांना त्या काळी कुणीही नाही म्हटले नाही. विदागीची भाषा केली नाही. गैरसोयी अंगावर घेत इथवरचा प्रवास करत साहित्यातील मान्यवर मंडळी औदुंबरक्षेत्री येत. समोरच्या श्रोत्यांशी संवाद साधत, गप्पा मारत. फारसा उपचाराचा भाग नसायचा. एखादी शाल आणि श्रीफळ यावर आलेला पाहुणा स्मित हास्य करत परतत असायचा आणि अशीच अनेक संक्रांतीची संमेलने सदानंद साहित्य मंडळाच्या शिरपेचात मोरपिसे खोवत गेली. सारस्वतांची नावे किती घ्यावीत? महाराष्ट्रकवी यशवंत, पंडित महादेवशास्त्री जोशी, दुर्गा भागवत, पु. ल. देशपांडे, व्यंकटेश

माडगूळकर, प्रा. राम शेवाळकर, नारायण सुर्वे, शंकर पाटील, शंकरराव खरात, काकासाहेब गाडगीळ आणि अनेक. प्रत्यक्ष साहित्यप्रेमी यशवंतराव चव्हाण हेसुद्धा या संमेलनात हजेरी लावून गेलेले दिसतात. त्यांना कवी सुधांशुंच्या या कामाबद्दल अपार आदर होता. इथल्या राजकारण्यांच्यात आजही कवींच्या बद्दल तसा आदर दिसतो आहे. हळूहळू औदुंबरचे संमेलन हे अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाला समांतर अशा पद्धतीनेच गणले जाऊ लागले. औदुंबरला झालेला अध्यक्ष भविष्यात अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचा अध्यक्ष होतो, असा समज या परिसरात रुजलेला आहे. येणाऱ्या मंडळींचा कान तयार झालेला आहे. त्यामुळे ते साहित्याचे नेणते जाणते बनलेले आहेत. इथे दिवसभर कवी संमेलन सुरू असते. कविता म्हणण्याची मुभा अणि कवितेवर तशीच आणि तितकीच चर्चा करण्याचीही मुभा असा हा समसमा साहित्ययोग असतो. त्यामुळे अनेक मातब्बर कवीसुद्धा आपली कविता पेश करण्याकरिता औदुंबर क्षेत्री येतात आणि नव्या जुन्या कवींशी चर्चा करून आनंदाने परततात. इथे मांडव घातला जात नाही. लोकांची फार मोठी ऊठबस करण्याची आणि त्याचे स्तोम माजविण्याची फारशी पद्धत नाही. भल्यामोठ्या सतरंज्या नाहीतर ताडपत्र्या पसरल्या जातात आणि रसिक श्रोते मांडी ठोकून साहित्याचा आस्वाद घेतात. अलीकडे संमेलनाच्या तरुतळी ग्रंथदालनही उभे केले जाते आणि तिथे ग्रंथविक्री पण होते. प्रत्यक्ष नामदेव ढसाळ आणि विजय तेंडुलकर अशांसारख्या मान्यवरांनी या संमेलनाला भरभरून दाद दिलेली आणि त्यात ते समरसही होऊन गेलेले आहेत. कविवर्य बा. भ. बोरकर संमेलनाचे अध्यक्ष होते, त्या वेळी समोरच्या श्रोत्यांत पु. ल. देशपांडे आणि सुनीताबाई देशपांडे होत्या. यावरून औदुंबर साहित्य संमेलनाची वाङ्मयीन ओळख होण्यास हरकत नसावी. कसलाही डामडौल नसलेल्या, रुसवे-फुगवे नसलेल्या या संमेलनात संमेलनापासून फटकून राहणाऱ्या चारुता सागर यांच्यासारख्या कथाकारांनी सुद्धा मनोभावे हजेरी लावलेली आहे. हे पण आवर्जून नोंदविले पाहिजे. संक्रांतीचे दिवस थंडीचे असतात. आजूबाजूला उसाची भरपूर लागवड असल्याने समोरची कृष्णा नदी थंडीने शहारत असते. अशा वेळी सायंकाळच्या सोनेरी उन्हात रसिकांची लगबग सुरू होते. एकमेकांचे पत्ते विचारले जातात. ख्याली-खुशाली विचारली जाते. व्यासपीठावर येणाऱ्या अध्यक्षाला गराडा घातला जातो. त्याच्या उदंड सह्या मागितल्या जातात आणि अध्यक्षांनी भरपूर बोलावे अशी मागणीही केली जाते. एखाद्या शाळकरी मुलानी एखादे वेड डोक्यात घ्यावे आणि ते अखंड चालू ठेवावे आणि त्यात साऱ्या परिसराला सामावून घ्यावे, हे खरोखरच फार मोठे साहित्य संचित म्हणायला हवे. प्रत्यक्ष कवी सुधांशु हे अत्यंत साधे आणि तितकेच स्नेहशील. माणसांचा त्यांचा संग्रह तसा विलोभनीयच म्हणायला हवा. कालांतराने ते 'पद्मश्री' झाले. म. भा. भोसले यांच्या कथा वि. स. खांडेकरांच्या दृष्टीस पडल्या. त्यातून 'जीवाचा सखा' यासारखा कसदार सिनेमाही निर्माण झाला. म. भा. भोसले हे धनगावचे. सुधांशु हे औदुंबरचे. या दोन्ही गावांच्या मध्ये औदुंबरची ग्रामपंचायत असलेले अंकलखोप हे गाव आहे. सुधांशुंनी या ग्रामपंचायतीचे सरपंचपदही भूषविले आहे. त्यामुळे त्यांचा जनसंपर्क आणखीनच वाढला. यातून सदानंद साहित्य संमेलनाला बळ मिळत गेले. पाठबळ मिळत गेले. नवोदित कवींच्या अध्यक्षतेखाली कवी संमेलन आणि सायंकाळी संमेलनाच्या अध्यक्षाचे बीजभाषण आणि पसायदानानंतर सर्वांना तिळगूळवाटप असा हा बहारदार कार्यक्रम गेली पंच्याहत्तर वर्षे विनाखंड सुरू आहे. याच वर्षी कविवर्य सुधांशु यांची जन्मशताब्दी संपन्न होते आहे. त्यामुळे संयोजकांना आणखीन हुरूप आला आहे. वर्षभर काही ना काही वाङ्मयीन उपक्रम चालू ठेवण्याचा त्यांचा मानस आहे. 'डोह'कार श्रीनिवास कुलकर्णी हा मनस्वी वाङ्मयसेवक आणि कसदार ललित गद्यकार या संमेलनाची अत्यंत दर्जेदार पद्धतीने देखभाल करतो आहे. अगदी प्रकृती साथ देत नसतानासुद्धा. महाराष्ट्रात साहित्य-संस्कृती किती खोलवर रुजलेली आहे याचेच हे गुणवत्तापूर्ण असे निदर्शन आहे. याकरिता कधीही अध्यक्षीय निवडणूक होत नाही. आरोप-प्रत्यारोप केले जात नाहीत. कोट्यवधीचा निधी गोळा करावा लागत नाही. जे लोकवर्गणीतून जमते, तेवढेच ते संक्रांतीच्या संमेलनाला पुरते असा आजवरचा अनुभव आहे. आता औदुंबरच्या सदानंद साहित्य संमेलनाला अनुसरून सांगली जिल्ह्यात छोटी मोठी पंचवीस-तीस संमेलने होऊ लागली आहेत. यातून साहित्य व्यवहाराला बळ मिळते आहे. नवागतांना व्यासपीठ उपलब्ध होते आहे. साहित्यचर्चा सातत्याने होताना दिसून येत आहे. एकूणचा आजच्या संगणक युगाच्या काळात साहित्यावर अशी मोहोर उमटणे हे खरोखरच आल्हाददायक वाटते. यातूनच भविष्यात मराठी सारस्वतांचा मळा फुलत जाणार आहे. दिव्याने दिवा पेटत जावा। गंगाकाठ कापत जावा तसा हा साहित्याचा औदुंबर येथील अक्षरधाम व्यवहार दूरवर रुजला आहे. औदुंबराच्या त्या तरुतळी जी अक्षरधारा निर्माण होते आहे, ती तितकीच अनुपम आणि अविस्मरणीय आहे.

●





अनुक्रमणिका

# 'साहित्याची समग्रता व साहित्य प्रशस्ती' अभ्यसनीय पुस्तक

प्रा. डॉ. माहेश्वरी गावित

साहित्याची समग्रता व साहित्य प्रशस्ती' हे डॉ. अनिल सहस्रबुद्धे यांचे चिन्मय प्रकाशनाने प्रसिद्ध केलेले पुस्तक. खरे तर या पुस्तकाचे शीर्षकच खूप काही सांगून जाते. या शीर्षकानुसार या पुस्तकातील लेखनाचेही दोन भागांमध्ये विभाजन करता येते. यातील पहिल्या भागात 'साहित्याची समग्रता' सांगितली आहे. 'वाङ्मय' म्हणून विचारात घेता, हा साहित्यप्रवास मौखिक आणि लिखित अशा दोन्ही स्तरांवर सुरू आहे. ललित साहित्य आणि वैचारिक किंवा शास्त्रीय साहित्य हे या प्रवासात आपापल्या परीने प्रकट होत आहे. शास्त्रीय साहित्य त्या विशिष्ट शास्त्रीय ज्ञानकक्षेतच प्रकट होत राहते. ललित साहित्य मात्र मानवाच्या इहजीवन आणि पारलौकिक जीवन यांच्या अनुषंगाने मानवी जीवनाशी सर्व अंगोपांगांसह प्रकट होत असते. साहित्यगत अनुभवविश्वाला कधीही एकारलेपण, विशिष्ट मर्यादा, एकांगीपणा येणे शक्य नसते. निसर्ग, वस्तुमात्र आणि प्राणिमात्र यांच्याशी सहजीवन, माणसाने अर्जित केलेल्या शास्त्र व कला ज्ञानाचे उपयोजन, माणसामाणसांतील वृत्ती-प्रवृत्ती, महत्त्वाकांक्षा आणि सर्वांभूती असलेले प्रेम, जिवंतपणाला जाणवणाऱ्या पारलौकिक अनुभूतींसह, व्यक्ती आणि संघमनस्क अशा दोन्ही पातळ्यांवर माणूस जगत असतो. हेच सूत्र लक्षात घेऊन या पुस्तकाच्या पहिल्या भागात साहित्याची समग्रता स्पष्ट केली आहे. साहित्यनिर्मिती आणि आस्वादप्रक्रिया, साहित्यकलेचे महत्त्व, साहित्यकलेची द्विध्रुवात्मकता अशी मांडणी करून साहित्याचा भाषाविज्ञान, सौंदर्यशास्त्र, संस्कृती, तत्त्वज्ञान, इतिहास, सामाजिक शास्त्रे, मार्क्सवाद, मानसशास्त्र, राज्यशास्त्र, विज्ञान, ज्योतिर्विज्ञान व दैववाद, वाङ्मयेतिहास आदी शास्त्रांशी असलेला परस्परसंबंध सोदाहरण स्पष्ट केला आहे. साहित्यविषयीचा सैद्धांतिक भाग हा या पुस्तकाच्या पहिल्या भागात मांडला आहे.

या पुस्तकाच्या दुसऱ्या भागात 'साहित्य प्रशस्ती' मांडली आहे. वेगवेगळ्या वाङ्मयप्रकारांतील, रचनाबंधांतील, कलांतील लेखनावर समीक्षा केली आहे. जवळजवळ २८ पुस्तकांवर समीक्षा केली आहे. चिकित्सक वृत्तीने, मर्मग्राहीपणे, कलाकृतीच्या सर्वच अंगोपांगांसह केलेली ही समीक्षा कलाकृतींचे विविध कंगोरे वाचकांसमोर उलगडते. या पुस्तकात डॉ. गणेश देवी, डॉ. सदानंद मोरे, डॉ. यू. म. पठाण, डॉ. देवीप्रसाद खरवंडीकर यांच्यासारख्या मान्यवर साहित्यिकांच्या साहित्याची जशी दखल घेतली आहे,



तशीच दखल प्रा.डॉ. राजकुमार घुले, कल्याणी आयतलवाड यांसारख्या नव्याने साहित्यक्षेत्रात उतरलेल्या प्रतिभावंत-प्रज्ञावंतांचीही घेतली आहे. या सर्वांच्या लेखनाचे तितक्याच अगत्याने, आस्वादक आणि संशोधक वृत्तीने स्वागत लेखक करतात, म्हणूनच प्रस्तुत पुस्तकात समीक्षण केलेल्या साहित्यकृतींमध्ये कमालीची वैविध्यता आहे. 'श्री नारायण लीला', 'श्री संत वामनभाऊ राजयोगी महंत भगवानबाबा', 'लेक सावित्रीची' हे चरित्रग्रंथ, 'पायपोळ', 'अमृताचे डोही आनंद तरंग' ही आत्मचरित्रे, 'जीवन मधुरम्', 'मर्मबंधातली ठेव' हे चिंतनात्मक लेखसंग्रह, 'शब्दसंस्कार'सारखे ललित स्फुटलेखांचे पुस्तक, 'दृष्टिमित्र'सारखे प्रबोधनात्मक पुस्तक, 'पानमळकर नावाचा गुरुजी' ही कादंबरी, 'श्री महाशक्ती मोहटादेवी' माहात्म्य ग्रंथ, 'मना घडवी संस्कार' हे बालगीतांचे-संस्कारगीतांचे पुस्तक, 'भारतीय भाषांचे लोकसर्वेक्षण'सारखा भाषिक संशोधनपर ग्रंथ, 'तुकाराम दर्शन'सारखा ग्रंथ, श्रीमद्भगवद्गीता शंका-समाधानासह' हा तत्त्वज्ञान निरूपणपर ग्रंथ, 'गर्भसंस्कार'सारखा ग्रंथ, 'सुप्रजनन'सारखा शास्त्रीय ग्रंथ, चित्ररूपातील सौंदर्यात्मकतेने जीवनानुभूती मांडणारा 'अनुभूतींच्या स्पंदनरेखा'सारखा ग्रंथ, 'विज्ञान ज्ञान गभस्ती', 'येरवडा विद्यापीठातील दिवस : एक चिकित्सक अभ्यास' हे संशोधनात्मक ग्रंथ, 'वाडगीची माची' ही आदिवासींच्या पराक्रमावर आधारलेली ऐतिहासिक कादंबरी, 'अमृताचा घनू'सारखी पासष्ट भजनांची भजनमाला, 'गृहपाठ', 'भावगंगा', 'प्रतिभासंगम' यांसारखे कवितासंग्रह, 'भावशलाका'सारखे चारोळ्यांचे पुस्तक अशी ही डॉ. सहस्रबुद्धे यांनी मांडलेली साहित्य प्रशस्ती.

हे पुस्तक अर्पण केले आहे ते 'मराठी विषयाच्या प्राध्यापक मित्रांना'. साहित्य हे कधीही एकारलेले नसते. माणसाच्या समग्रतेचा, व्यामिश्रतेचा साहित्यातून आविष्कार होत असतो. साहित्याची ही व्यापकता प्रस्तुत पुस्तकात सोदाहरण प्रकटते. विविध वाङ्मयप्रकारांमध्ये मोडणाऱ्या लेखनाची, तसेच विविध कलांची, कलाकलांमधील परस्पर संबंधांची, त्यामधील सौंदर्यस्थळांची चर्चा या पुस्तकात केली आहे.

● प्रा.डॉ. माहेश्वरी गावित
चलभाष : ९४२२४१४२०२



अनुक्रमणिका

कार्यवृत्त

प्रकाश पायगुडे

# म.सा.प. इतर शाखा कार्यवृत्त नोंद
## (१ जानेवारी २०१८ ते ३१ मार्च २०१८)

### महाराष्ट्र साहित्य परिषद, सावेडी उपनगर शाखा

अहमदनगर जिल्ह्यातील सावेडी उपनगर शाखेच्या वतीने २९व्या विभागीय साहित्य संमेलनाचे दि. ४-५ नोव्हेंबर २०१७ रोजी दिमाखदार आयोजन करण्यात आले. प्रचंड उत्साहात ग्रंथ दिंडीचे आयोजन करण्यात आले. शालेय विद्यार्थी, नाट्यचित्रपट, कलावंत, साहित्य रसिक सहभागी झाले. संमेलनाध्यक्ष प्रा. रंगनाथ पठारे, रामदास फुटाणे, परिषदेचे सर्व पदाधिकारी उपस्थित होते. प्रा. पठारे यांच्या हस्ते ग्रंथ प्रदर्शनाचे उद्‌घाटन झाले. ग्रंथ प्रदर्शनामुळे अनेक साहित्य रसिकांना नवी पुस्तके पाहता आली.

माजी आमदार व वात्रटिकाकार रामदास फुटाणे यांच्या हस्ते उद्‌घाटन झाले. श्री. फुटाणे व प्रा. पठारे यांनी साहित्यविषयक जाणिवा विस्तारण्याच्या व लेखकांनी व साहित्यिकांनी ठोस भूमिका घेण्याच्या आवश्यकतेवर ऊहापोह केला. या सोहळ्याला प्रेक्षकांचा उदंड प्रतिसाद मिळाला.

भोजनोत्तर कार्यक्रमात प्रा. अप्पा खोत, सुरेश देशपांडे, सौ. रेखा मुंदडा, ज्योतिराम फडतरे यांच्या बहारदार कथांनी रंग भरला. 'नगर जिल्ह्याचे साहित्यातील योगदान' या विषयावर डॉ. लीलाताई गोविलकर, प्रा. संदीप सांगळे, प्रा. खासेराव शितोळे, लहू कानडे, कैलास दौंड यांनी गतकाळातील समकालीन साहित्यिकांच्या कार्याचा आढावा घेतला. कवी संदीप खरे, संजीवनी तडेगावकर आणि भरत दौंडकर यांनी कविसंमेलनाची पातळी वेगळ्या उंचीवर नेली. नगरच्या सुकन्या अंजली व नंदिनी गायकवाड यांच्या हिंदी मराठी गीतांनी बहार आणली.

दुसऱ्या दिवशी ज्येष्ठ साहित्यिक व मसापचे विश्वस्त, माजी खासदार यशवंतराव गडाख पाटील यांनी दिलखुलास मुलाखत दिली. सुप्रसिद्ध मुलाखतकार सुधीर गाडगीळ यांच्या प्रश्नांना कोणताही आडपडदा न ठेवता उत्तरे दिल्यामुळे रसिकांना गडाख साहेबांचे अनेक पैलू उलगडत गेले. निमंत्रितांच्या कवीसंमेलनाचे नेतृत्व रामदास फुटाणे यांनी केले. विविध भागातल्या प्रतिभावंत तरुण कवींनी काही लोकप्रिय व नव्या कविता सादर केल्या. संवेदनशील लेखिका दिशा शेख यांची निलिता जाधव बंडेलू यांनी मुलाखत घेतली. 'माईक' ही पुरुषोत्तक करंडक २०१७ची विजेती एकांकिका खूप प्रभावीपणे सादर झाली.

संमेलनाचा समारोप मा. खा. यशवंतराव गडाख यांच्या हस्ते करण्यात आला. कार्यक्रम सर्वसमावेशक असल्यामुळे रसिकांना ओतप्रोत आनंद देणारा ठरला. स्वागताध्यक्ष नरेंद्र फिरोदिया आणि प्रमुख कार्यवाह जयंत येलूलकर यांनी घेतलेल्या अपार कष्टामुळे व कल्पकतेमुळे संमेलनाचे उत्तम आयोजन करण्यात आले. रंगमंच सजावट ते सभागृहातील प्रसन्न वातावरणामुळे वाढत असलेला उष्माही आल्हाददायक वाटत होता. कार्यकारी

### महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा नाशिकरोड

**दि. १८ नोव्हेंबर २०१७ : संवाद सृजनाशी, पुष्प ६ वे :**

कल्याण येथील प्रसिद्ध गझलकार श्री. प्रशांत वैद्य यांनी म.सा.प. शाखा नाशिकरोड आयोजित 'संवाद सृजनाशी' या मालिकेतील ६ वे पुष्प गुंफले. शाखेचे कोषाध्यक्ष श्री. सुदाम सातभाई यांनी मायेची शाल, स्मृतिचिन्ह, ग्रंथ भेट देऊन त्यांचा सत्कार केला.

कार्यक्रमासाठी शहरातील नामवंत गझलकार श्री. गौरवकुमार आठवले, श्री. संतोष वाटपाडे, श्रीमती जयश्री कुलकर्णी, श्री. आकाश कंक्राळ, श्री. प्रशांत केंदळे यांच्यासह ज्येष्ठ पोलिस निरीक्षक श्री. मधुकर कड, श्री. नंदकुमार खाडे, शाखेचे कार्याध्यक्ष श्री. उन्मेष गायधनी, उपाध्यक्ष श्री. दत्ता गायकवाड, प्रमुख कार्यवाह श्री. प्रसाद पवार, नि. प्र. जि. न्या. श्री. प्रकाश कऱ्हाडकर, नि. जि. न्या. कवी श्री. वसंत पाटील आदी रसिक उपस्थित होते.

कार्यक्रमाचे सूत्रसंचालन श्रीमती अलका अमृतकर यांनी केले. श्री. सुशांत उबाळेंनी सादर केलेल्या स्वागत काव्याने कार्यक्रमाची सुरुवात झाली.

कार्यक्रम यशस्वितेसाठी कार्यकारिणी सदस्य श्री. दशरथ लोखंडे, श्री. शिवाजी म्हस्के, श्री. प्रशांत केंदळे, श्री. राहुल बोराडे, श्रीमती मंगला सातभाई, श्रीमती रेखा पाटील आणि



अनुक्रमणिका

श्री. संजय करंजकर यांनी प्रयत्न केले.

**दि. ९ डिसेंबर २०१७ : पुष्प ७ वे :**

प्रसिद्ध कथा-पटकथा-संवाद लेखक श्री. हेमंत एदलाबादकर यांनी महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा नाशिकरोड आयोजित 'संवाद सृजनाशी' या मालिकेतील ७ वे पुष्प गुंफले. या वेळी त्यांनी अनेक कथा सादर केल्या. त्यातील चिनी चित्रपटाची कथा आणि गोव्यातील प्रेमकथेला लोकांनी उचलून धरले. श्री. दादा कोंडकेंच्या 'विच्छा माझी पुरी करा' नाटकाचा राष्ट्रीय नाटक अकादमीत सादर केलेल्या प्रयोगावरून तेथील शिक्षकांनाच नाटकाचे धडे कसे शिकवले, हे सांगितले.

**दि. १३ जानेवारी २०१८ : पुष्प ८ वे :**

'कविमनातील भावना केवळ दोन ओळीत सामावून घेण्याची ताकद केवळ गजलेत आहे. उर्दूतील पहिले गजलकार अमीर खुस्रो यांनी हा काव्यप्रकार विकसित केला. नोकरी सांभाळून सारस्वताचे हे देणे देत गेल्याने, माझे जीवन गजलेभोवतीच फिरते आहे,' असे प्रतिपादन सुप्रसिद्ध गजलकार श्री. नासिर शकेब यांनी महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा नाशिकरोड आयोजित 'संवाद सृजनाशी' या मालिकेतील आठवे पुष्प गुंफताना केले.

**दि. २ जानेवारी ते २७ जानेवारी २०१८ : ग्लोरियस अजंता आंतरराष्ट्रीय प्रदर्शन :**

कार्यक्रमास भूतानचे राजदूत मा. म. श्री. व्ही. नाम्येल, केंद्रीय मंत्री मा. ना. श्रीमती स्मृती इराणी, खा. श्री. हेमंत गोडसे, आय. सी. सी. आर.चे अध्यक्ष खा. श्री. विनयजी सहस्रबुद्धे व माजी अध्यक्ष मा. श्री. लोकेश चंद्र, आय. जी. एन. सी.ए. अध्यक्ष मा. श्री. राम बहादूर राय, खा. श्री. स्वामी अग्निवेश, खा. श्री. अरविंद सावंत, खा. श्री. विनायक राऊत, सुदर्शन टी. व्ही. मु.का.अ. श्री. सुरेश चव्हाणके, केंद्रीय सचिव श्रीमती सुजाता चंद्र आदी मान्यवरांनी भेट दिली. मान्यवरांचा शाखेच्या वतीने मायेची शाल, ग्रंथ भेट देऊन स्वागत केले.

**दि. २७ जानेवारी २०१८ : साहित्य संमेलनाध्यक्ष लक्ष्मीकांत देशमुख यांचा सत्कार :**

वाचनसंस्कृती टिकवायची असेल तर शालेय स्तरावर प्रयत्न करणे आवश्यक आहे, असे बडोदा येथील ९१व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष श्री. लक्ष्मीकांत देशमुख यांनी महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा नाशिकरोड आयोजित नागरी सत्कारास उत्तर देताना प्रतिपादन केले.

शाखेचे कार्याध्यक्ष श्री. उन्मेष गायधनी यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या कार्यक्रमात नाशिकच्या प्रथम नागरिक महापौर श्रीमती रंजना भानसी, जिल्हा परिषद अध्यक्षा श्रीमती शीतल सांगळे, मा. आ. श्री. बाळासाहेब सानप, सा. वा. ना.चे सचिव श्री. श्रीकांत बेणी, उपाध्यक्ष श्री. दत्ता गायकवाड, जिल्हा प्रतिनिधी श्री. नितीन ठाकरे यांनी श्री. देशमुखांचा सत्कार केला.

सार्वजनिक वाचनालय नाशिक, माणकेश्वर सार्वजनिक वाचनालय निफाड आणि सार्वजनिक वाचनालय सिन्नर यांनी नियोजित अध्यक्षांचा सत्कार केला. सभासद चित्रकार श्री. रमेश जाधव यांनी स्वतः संमेलनाध्यक्षांच्या रेखाटलेल्या चित्राने त्यांचा सत्कार केला.

आपल्या मनोगतात महापौर श्री. भानसी म्हणाल्या, की 'पुढील साहित्य संमेलन जर नाशिकरोडला आयोजित केले तर नाशिक महानगरपालिका सर्व सहकार्य करेल.'

**दि. २७ फेब्रुवारी २०१८ : मराठी अभिजात भाषा होण्यासाठी:**

दै. 'दिव्य मराठी'चे राज्य संपादक मा. श्री. प्रशांत दीक्षित यांनी महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा नाशिकरोड आयोजित 'मराठी अभिजात भाषा होण्यासाठी' कै. रमेशकाका मराठे स्मृती व्याख्यान मालिकेतील दुसरे पुष्प गुंफले.

**दि. ८ मार्च २०१८ : जागतिक महिला दिन :**

जागतिक महिला दिनानिमित्त महाराष्ट्र साहित्य परिषद-शाखा नाशिकरोडने आयोजित केलेल्या ॲड. प्रेरणा देशपांडे यांच्या 'मी द्रौपदी बोलतेय' हा एकपात्री प्रयोग संपन्न झाला. या वेळी श्रीमती अलका अमृतकर यांनी शाल, स्मृतिचिन्ह, ग्रंथभेट देऊन त्यांचे स्वागत केले.

कार्यक्रमासाठी १०० पेक्षा जास्त स्त्रिया आणि वीस-बावीस पुरुष उपस्थित होते. शाखेचे कार्याध्यक्ष श्री. उन्मेष गायधनी, उपाध्यक्ष श्री. दत्ता गायकवाड, कोषाध्यक्ष श्री. सुदाम सातभाई, कार्यवाह श्री. रवींद्र मालुंजकर, कार्यकारिणी सदस्य श्री. दशरथ लोखंडे व श्री. शिवाजी म्हस्के, ऋतुरंग परिवाराचे सचिव श्री. प्रकाश पाटील, रंगकर्मी श्री. राजा पत्की, सल्लागार श्री. पांडुरंग चव्हाण आदी उपस्थित होते.

कार्यक्रम यशस्वितेसाठी कार्यकारिणी सदस्या श्रीमती कामिनी तनपुरे, श्री. राहुल बोराडे, श्री. महेश वाजे, श्रीमती नलिनी कड, वासंती ठाकुर, श्री. हर्षल भामरे आदींनी प्रयत्न केले. चहापानाने कार्यक्रमाची सांगता झाली.

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा सोलापूर (मुख्य शाखा)

**दि. १७ ते १९ डिसेंबर २०१७ : शेट लोणकरणजी चंडक स्मृती व्याख्यानमाला :**

महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा सोलापूर आणि शेठ लोणकरणजी जगन्नाथजी चंडक ट्रस्ट, सोलापूर यांच्या संयुक्त विद्यमाने शेठ लोणकरणजी चंडक स्मृती व्याख्यानमालेचे आयोजन दि. १७ ते १९ डिसेंबर २०१७चे दरम्यान ॲम्फीथिएटर, सोलापूर येथे करण्यात आले होते. हे व्याख्यानमालेचे एकविसावे वर्ष होते.

**पुष्प पहिले : दि. १७ डिसेंबर :** व्याख्यानमालेचे पहिले पुष्प साहित्यिक आणि समीक्षक डॉ. रवींद्र शोभणे, नागपूर यांनी

गुंफले. 'महाभारताचा मूल्यवेध' हा त्यांच्या व्याख्यानाचा विषय होता. प्रास्ताविक किशोर चंडक यांनी केले. चंडक ट्रस्टच्या कार्याची त्यांनी माहिती दिली. या वेळी मंचावर गिरीश चंडक उपस्थित होते.

**पुष्प दुसरे : दि. १८ डिसेंबर :** दुसरे पुष्प कवी नंदन रहाणे, नाशिक यांनी गुंफले. 'माझ्या शायरीचे रंग' हा त्यांच्या व्याख्यानाचा विषय होता.

**पुष्प तिसरे : दि. १९ डिसेंबर :** व्याख्यानमालेचे तिसरे पुष्प मानसी मागीकर यांनी 'मी मानसी' विषयाच्या प्रकट मुलाखतीतून गुंफले. मुलाखत अश्विनी तडवळ यांनी घेतली. किशोर चंडक यांनी प्रास्ताविक केले. कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी डॉ. सुहास पुजारी होते.

**दि. १ मार्च २०१८ : मराठी भाषा गौरव दिन :**

कवी कुसुमाग्रज तथा वि. वा. शिरवाडकर यांच्या जयंतीनिमित्त सोलापुरातील नामवंत कवींचे कविसंमेलन आयोजित करण्यात आले. प्रारंभी झी मराठी वाहिनीवरील 'सा रे ग म प' या सांगीतिक कार्यक्रमात सहभागी असलेले गायक समीर पोतनीस यांनी कवी सुरेश भटांची 'लाभले आम्हास भाग्य...' ही कविता सादर केली. या वेळी नारायण कुलकर्णी (सोलापूर), माधव पवार, मारुती कटकधोंड, राजेंद्र भोसले, बदिउज्जमा बिराजदार, गिरीश दुनाखे, सुयश कविटकर, सागर अचलकर यांच्या दर्जेदार कवितांचे वाचन झाले. या कार्यक्रमात डॉ. लक्ष्मीनारायण बोल्ली यांना शाखेतर्फे भावपूर्ण श्रद्धांजली वाहण्यात आली.

कार्यक्रमासाठी विशेष परिश्रम घेणारे पदाधिकारी : डॉ. सुहास पुजारी, दत्ता अण्णा सुरवसे, अॅड. जे. जे. कुलकर्णी, बाबुराव मैंदर्गीकर, मारुती कटकधोंड, बदीउज्जमा बिराजदार, किशोर चंडक, राजेंद्र भोसले, नरेंद्र काटीकर, डॉ. श्रुती वडगबाळकर, माधव पवार, निर्मला मठपती, वंदना कुलकर्णी, ब. गो. अहंकारी इत्यादी.

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा इचलकरंजी

**दि. १४ फेब्रुवारी २०१८ : इचलकरंजी म.सा.प. सदस्यांची विंदा करंदीकर जन्मस्थळी भेट :**

म.सा.प., शाखा इचलकरंजीच्या वतीने 'साहित्यिकांच्या गावी भेट' असा एक स्तुत्य उपक्रम सुरू केला असून, दरवर्षी एका दिवंगत मान्यवर साहित्यिकाच्या गावी जाऊन तेथे त्यांच्या काव्य, कथा, कादंबरीवर चर्चा असा साहित्यिक उपक्रम सुरू केला आहे. या अंतर्गत भा. रा. तांबे, कवी केशवसुत, रणजित देसाई यांच्या जन्मगावी हा उपक्रम राबविला. नंतर या वर्षी कवी विंदा करंदीकर यांच्या जन्मशताब्दीचे औचित्य साधून त्यांच्या देवगड तालुक्यातील घालवली या जन्मगावी साहित्यप्रेमींची सहल आयोजित केली होती.

वृत्तपत्रकार 'दर्पण'कर्ते बाळशास्त्री जांभेकर यांच्या पोंबुर्ले जन्मस्थानातील जांभेकर स्मृती सदनास भेट दिली. तिथे त्यांच्या अल्पचरित्राचे व सुरुवातीच्या वृत्तपत्र लेखनाचे वाचन करण्यात आले. विंदा करंदीकरांच्या घालवली या गावी पोहोचल्यावर त्यांच्या वंशजांतील भालचंद्र करंदीकर कुटुंबीयांनी सर्वांचे मनःपूर्वक स्वागत केले. गझलकार नानिवडेकर यांनी विंदांच्या काही कवितांचे उत्कृष्ट सादरीकरण केले. म.सा.प. अध्यक्षा सौ. वैशाली नायकवडे यांनी विंदांच्या साहित्याचा आढावा घेऊन त्यांच्या काही कविता सादर केल्या. शाहीर विजय जगताप यांचा खणखणीत आवाज घुमला. आंबा, काजू, फणस, नारळ आदी वृक्षराजीच्या त्या वनात सर्व उपस्थित रसिकवरांनी शाहिरांच्या शिवगौरव गीताला खणखणीत साथ दिली.

विजयदुर्ग किल्ल्याच्या दरबार हॉलमध्ये शाहीर विजय जगताप यांनी 'चमके शिवबाची तलवार' हे शौर्यगीत सादर केले. सौ. माधुरी काजवे यांनी शिवगौरव गीत गाऊन उत्कृष्ट वातावरणनिर्मिती केली.

सौ. सुनंदा कांबळे या कोकणातील मालवणी बोली भाषेतील सुप्रसिद्ध कवयित्री असून त्यांचे मालवणी व मराठी भाषेतील काव्यसंग्रहही प्रकाशित झाले आहेत. त्यांनी मालवणी भाषेतील एकापेक्षा एक सरस काव्यरचना सादर केल्या. मधुसूदन नानिवडेकर, सौ. वैशाली नायकवडे, पाटलोबा पाटील, शाहीर विजय जगताप, अॅड. सौ. माधुरी काजवे यांनीही आपल्या काव्यरचना सादर केल्या. निसर्गरम्य वातावरणात एक उत्कृष्ट साहित्यिक मैफल पार पडली.

या साहित्यिक सहलीत कार्यवाह अशोक दवंडे, पवन चौगुले, नदाफ, सौ. उज्ज्वला जाधव, पाटलोबा पाटील, शाहीर विजय जगताप, अॅड. माधुरी काजवे, सौ. वैशाली नायकवडे आदी साहित्यिक व अशोक बेलेकर, प्रशांत गुरव, माळी सर, अशोक रसाळ, प्रा. सौ. सव्वाखंडे व इतर साहित्यिक रसिक सामील झाले होते. उत्साही वातावरणात, निसर्गाच्या सान्निध्यात ही साहित्य सहल संपन्न झाली.

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा दामाजीनगर

१. दि. २० सप्टेंबर २०१७ : गझलकार कालिदास चवडेकर यांच्या गझल गायनाचा कार्यक्रम राजेंद्र भोसले (सोलापूर) यांच्या अध्यक्षतेखाली झाला. या वेळी सौ. आशा पाटील, विजय देशपांडे, सौ. संगीता मासाळ, धनंजय पाटील, दत्ता

सरगर, गोरक्ष जाधव, सुनील बिराजदार यांनीही आपली कविता सादर केली.

**२. दि. १ ऑक्टोबर २०१७ :** ऐतिहासिक माहितीपट या विषयावर मुंबई दूरदर्शनचे निर्माते व दिग्दर्शक विनय धुमाळे यांचे व्याख्यान झाले. त्यांचे सोबत त्यांचे सहकारी सुनील कवळे, कॅमेरामन चंद्रकांत अडवणे, शैलेंद्र निर्मले उपस्थित होते.

**३. ७ ऑक्टोबर २०१७ :** कोजागिरी पौर्णिमेस काव्य गीत गायनाची मैफल झाली. त्यात सौ. शुभदा जोशी, जयलक्ष्मी यल्लटीकर, दिगंबर भगरे, दत्तात्रय वाघ, लहू ढगे, अशपाक काझी, यतिराज वाकळे यांनी गीते व कविता सादर केल्या.

**४. १५ ऑक्टोबर २०१७ :** प्रेरणा प्रतिष्ठानच्या सहयोगाने वाचक दिनी बहुश्रुत वाचक पुरस्कार पांडुरंग जोशी यांना व वाचनप्रेमी पुरस्कार बालाजी शिंदे, सौ. रेश्मा गुंगे, ऋतुजा यादव, दशरथ शिवशरण यांना डॉ. अरुण शिंदे यांचे हस्ते देण्यात आला.

**५. २० ऑक्टोबर २०१७ :** सुरेल दिवाळी पहाट या कार्यक्रमांतर्गत मराठी भक्तिगीते व भूपाळ्या दिगंबर भगरे, शुभदा जोशी, दत्तात्रय वाघ, डॉ. शबनम सय्यद, डॉ. प्रीती शिर्के, डॉ. शाकीर सय्यद, लहू ढगे, प्रफुल्लता स्वामी, सुधा मांडवे, अशपाक काझी यांनी सादर केल्या.

**६. ६ डिसेंबर २०१७ :** मराठी साहित्यातील डॉ. बाबासाहेब आंबेडकर या विषयावर व्याख्यान. व्याख्याते प्रा. दत्ता सरगर, अध्यक्ष प्रकाश जडे.

**७. १२ डिसेंबर २०१७ :** शहर एन्टरटेन्मेंटच्या सहयोगाने लघु चित्रपट महोत्सवाचे आयोजन. त्यात परिसरातील निर्मात्यांचे १२ लघुपट दाखवण्यात आले. महोत्सवाचे उद्घाटन नगराध्यक्षा सौ. अरुणा माळी व नृत्यांगना माधवी पवार यांनी केले.

**८. १७ डिसेंबर २०१७ :** श्यामची आई यशोधरा साने यांच्या स्मृती शताब्दीनिमित्त शालेय विद्यार्थ्यांसाठी निबंध स्पर्धा घेण्यात आली. विजेत्यांना स्मृतिचिन्हे देऊन गौरविण्यात आले.

**९. ३० डिसेंबर २०१७ :** '२१व्या शतकात श्रीकृष्ण' या विषयावर डॉ. गिरीश जखोटिया (मुंबई) यांचे व्याख्यान, अध्यक्ष कविवर्य निलेश देशमुख.

**१०. ७ जानेवारी २०१८ :** साहित्य अकादमी, दिल्लीचा अनुवाद पुरस्कारप्राप्त प्रा. डॉ. बळवंत जेऊरकर (सांगली) यांचे व्याख्यान. विषय : अनुवादाचा प्रवास व प्रकट मुलाखत.

**११. १२ जानेवारी २०१८ :** कविवर्य नारायण सुमंत यांचे मसाप कार्यालयात काव्यवाचन व कथाकथन.

**१२. २५ जानेवारी २०१८ :** 'रंग दे बसंती' हा मराठी, हिंदी देशभक्तीपर गीतांचा कार्यक्रम प्रजासत्ताक दिनाच्या पूर्वसंध्येला माजी सैनिक संघटनेच्या सहकार्याने घेण्यात आला. राष्ट्रभक्तीपर गीते शुभदा जोशी, दिगंबर भगरे, लहू ढगे, लक्ष्मी माने, विद्या माने, क्रांती डोंगरे, संगीता वासनिक, शाहीर साखरे आदींनी सादर केली.

**१३. शाखा भेटी :** प्राचार्य सुमंत टेकडे (नागपूर), नृत्यांगना माधुरी पवार (सातारा), हायकूकार रवी सोनार व प्रकाशक सचिन कुलकर्णी (पंढरपूर) यांनी शाखेस भेटी दिल्या.

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा चाळीसगाव

**१. वार्षिक सर्वसाधारण सभा :** महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे; शाखा चाळीसगावची वार्षिक सर्वसाधारण सभा दि. १९ नोव्हेंबर २०१७ रोजी मा. प्राचार्य तानसेन जगताप (जिल्हा प्रतिनिधी व संस्थापक अध्यक्ष) यांच्या अध्यक्षतेखाली संपन्न झाली. सभेसाठी सुमारे ७० आजीव सभासदांनी उपस्थित राहून कामकाजात भाग घेतला.

याप्रसंगी म.सा.प. आयोजित परीक्षांतील गुणी विद्यार्थ्यांचा कौतुक सोहळा पार पडला. प्रथमा परीक्षेत राज्यातून प्रथम आलेली कु. काजल पाटील (रा. कन्या शाळा) या विद्यार्थिनीचा, तसेच कु. दीक्षा घुसळे (राज्यात द्वितीय-विवेकानंद विद्यालय), चि. उत्कर्ष शिरूडे (राज्यात द्वितीय - आ. बं. हायस्कूल) तसेच तृतीय क्रमांक राज्यातून मिळवणाऱ्या कु. सारिका देशमुख व कु. साक्षी जाने (दोन्ही- कन्याशाळा) या गुणवंतांचा विशेष सन्मान करण्यात आला व सोबतच सर्व सहभागी शाळांमधून प्रथम व द्वितीय आलेल्या विद्यार्थ्यांचेही कौतुक या प्रसंगी करण्यात आले.

**२. इंदिरा संत जन्म दिन :** ज्येष्ठ कवयित्री इंदिरा संत यांच्या जन्मदिनानिमित्ताने दि. ४ जानेवारी २०१८ रोजी शाखेच्या कार्यालयात छोटेखानी कार्यक्रमाचे आयोजन करून त्यांच्या कवितांचा जागर करण्यात आला. प्रा. पी. एस. चव्हाण यांनी त्यांचा जीवनपट उपस्थितांसमोर मांडला व त्यांच्या काही कवितांचे रसग्रहण सादर केले.

**३. म.सा.प. व्याख्यानमाला :** मसाप शाखा, चाळीसगाव आयोजित व्याख्यानमालेच्या यंदाच्या चौथ्या वर्षाचे आयोजन दि. ६ ते ८ जानेवारी २०१८ दरम्यान करण्यात आले. या तीन दिवसीय ज्ञानयज्ञाचे उद्घाटन प्राचार्य महेंद्र कदम यांनी 'संप्रमाच्या वाटेवर' या विषयावरील व्याख्यानाने केले.

दुसऱ्या दिवसाचे पुष्प सुप्रसिद्ध संवादक, साहित्यिक, कलावंत डॉ. विश्वास मेहेंदळे यांनी 'मला भेटलेली माणसं' हा विषय सादर करून गुंफले. कु. श्रावणी कोटस्थाने हिने 'जय शारदे वागेश्वरी' हे गीत सादर करून कार्यक्रमाची सुरुवात केली.

याप्रसंगी कवी सुनील गायकवाड यांना त्यांच्या 'भिलाऊ आदिवासी लोकसाहित्य व इतिहास' या नवीन प्रकाशित पुस्तकाच्या निमित्ताने डॉ. मेहेंदळे यांच्या हस्ते सन्मानित

करण्यात आले. जगताना अनेक भली-बुरी माणसं भेटतात; परंतु त्यातील चांगली माणसे फक्त स्मरणात ठेवायची असतात अन् वाईट माणसांना विसरून जायचे असते. सुखी व आनंदी जीवनाचा हाच खरा मूलमंत्र आहे.

व्याख्यानमालेचे तिसरे पुष्प प्रा. डॉ. फुला बागुल, शिरपूर यांनी 'साहित्यातील संवेदनशीलता' या विषयावर गुंफले. तसेच अंकुर साहित्यसंघाच्या जिल्हाध्यक्षा डॉ. सौ. साधना निकम यांना डॉक्टरेट मिळाल्याबद्दल त्यांचा सन्मान करण्यात आला.

ज्ञान, मनोरंजन व उद्‌बोधनाचा वसा घेतलेली ही व्याख्यानमाला यशस्वी करण्यासाठी कार्याध्यक्ष विजय पाटील, प्रमुख कार्यवाह गणेश आढाव, कोषाध्यक्ष अण्णा धुमाळ, उपाध्यक्ष रामभाऊ शिरोडे व ॲड. सुषमा पाटील तसेच कार्यवाह बी. एल. ठाकरे व प्रा. पी. एस. चव्हाण तसेच सर्व कार्यकारिणी सदस्यांनी प्रयत्न केले. तसेच विश्‍वस्त मंडळाचे मार्गदर्शन व रसिकांचा भरगच्च प्रतिसाद यामुळे ही व्याख्यानमाला यशस्वी ठरली.

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा - पंढरपूर

१. महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा पंढरपूर यांचे वतीने 'सरदार मल्हारराव होळकर' या ऐतिहासिक चरित्र ग्रंथाचे प्रकाशन डॉ. द. ता. भोसले, ज्येष्ठ साहित्यिक यांच्या हस्ते करण्यात आले. अध्यक्षस्थानी नानासाहेब लिंगाडे होते. या वेळी प्रमुख वक्ते डॉ. राजेंद्र मगर, अकलूज व डॉ. सुशिला पिंजारी यांनी आपले मनोगत व्यक्त केले.

ग्रंथाचे लेखक गोपाळराव देशमुख यांनी मल्हाररावांचा जीवनपट उलगडून दाखवला. कार्यक्रमासाठी पंढरपुरातील अनेक नामवंत साहित्यिक श्रोते उपस्थित होते.

२. म.सा.प. शाखा पंढरपूर यांच्या वतीने वाचन प्रेरणा दिनानिमित्त दीपोत्सव काव्यवाचन स्पर्धांचे आयोजन करण्यात आले होते. सदर स्पर्धा महाविद्यालयीन व खुला अशा दोन गटांत घेण्यात आल्या.

३. म.सा.प. शाखा पंढरपूरच्या वतीने विंदा करंदीकर यांच्या जयंतीनिमित्त दिनांक २८ नोव्हेंबर २०१७ रोजी 'विंदायन' कार्यक्रमाचे आयोजन करण्यात आले होते. सदर कार्यक्रम सोलापूरमधील कलाकार रजनीश जोशी, विद्या लिमये, गुरुराज जोशी व शंतनू कोर्टीकर यांनी सादर केला. विंदांच्या काही आठवणी व त्यांच्या कविता सादर केल्या. समीक्षा लेखनातील उतारे वाचन करून त्यांचा जीवनपट उलगडला. सदर कार्यक्रम कवठेकर प्रशाला, पंढरपूर येथे संपन्न झाला.

कार्यक्रमासाठी वा. ना. उत्पात, प्राचार्य मिलिंद परिचारक, नानासाहेब रत्नपारखी, प्राचार्य दामोदरे व धनाजी चव्हाण, मुख्याध्यापक शांताराम कुलकर्णी उपस्थित होते.

## महाराष्ट्र साहित्य परिषद, ठाणे जिल्हा शाखा

**१. २३ सप्टेंबर २०१७ :** ज्येष्ठ व्याख्याते/ विचारवंत मा. श्री. आनंद भागवत यांचे प्रा. म. वि. फाटक स्मृतिपुष्प वर्ष तिसावे या निमित्ताने 'छत्रपती शिवाजी महाराज : एक नवा विचार' या विषयावर व्याख्यान आयोजित केले होते. रियासतकार गो.स. सरदेसाई, अ. सी. केळुसकर, ब. मो. पुरंदरे, बाळशास्त्री हरदास इत्यादींनी साकारलेल्या शिवाजी महाराजांच्या चरित्राचे वाचन केल्यानंतर दिसून येते, की आपल्याला सगळे समजते असे महाराज कधीही म्हणताना दिसत नाहीत. योग्य ती पारख करूनच महत्त्वाची जबाबदारी आपल्या सरदारांवर सोपवत असत. इ. विचार या वेळी भागवतांनी व्यक्त केले. या कार्यक्रमात ठाणे नगर वाचन मंदिर ही संस्था सहभागी झाली होती.

**२. दि. २६ नोव्हेंबर २०१७ :** या दिवशी विंदा करंदीकरांच्या जन्मशताब्दीनिमित्त विंदांचे काव्य व अन्य साहित्यप्रवास उलगडून सांगणारे 'विंदा-गोविंदा' असा विषय घेऊन ज्येष्ठ समीक्षक डॉ. अनंत देशमुख यांचे व्याख्यान आयोजित केले होते. विंदांच्या बालवयातच गांधीवाद, सावरकरी विचार, साने गुरुजींचे वाङ्मय, पुढे रशियन राज्यक्रांती, मार्क्सवाद, भारतीय स्वातंत्र्यलढा, संयुक्त महाराष्ट्र आंदोलन इत्यादींचा प्रभाव असल्याचे दिसून येते. कुसुमाग्रज, बोरकर, ना. घ. देशपांडे, अनिल, इंदिरा संत, यांचे काव्य जोमात असतानादेखील करंदीकर त्या काळात कविता लिहीत होते, पण त्यांची कविता स्वतंत्र राहिली. कामगार वर्गाविषयीची आस्था, स्त्रीविषयक प्रेम, काही व्यक्तिचित्रणात्मक कविता असे त्यांच्या कवितांचे गट पाडता येतात. पुढे त्यांनी विलापिका, आततायी अभंग, मुक्तसुनीते असे कविता लेखनात प्रयोगही केले. त्यांनी बालगीतांमध्येही लक्षणीय भर घातली. ज्ञानेश्‍वरांच्या अमृतानुभवाचे त्यांनी केलेले अर्वाचिनीकरणही महत्त्वाचे मानले जाते. करंदीकरांचे 'ॲरिस्टॉलचे काव्यशास्त्र', 'राजा लियर' यासारखे अनुवादही मोलाचे आहेत. त्यांनी इंग्रजीतून साहित्य समीक्षापर केलेले लेखन साहित्यमूल्यांची समीक्षा (अनुवाद : प्रा. आ. ना. पेडणेकर) म्हणून प्रसिद्ध आहे. त्यांचे 'आकाशाचा अर्थ', 'स्पर्शाची पालवी' या ललित संग्रहातील लेख तत्कालीन दुर्गा भागवत, इरावती कर्वे, प्रकाश संत, एलकुंचवार या मान्यवरांच्या लेखनाहूनही वेगळे व विचारप्रवर्तक ठरणारे आहेत.

**३. दि. १७ डिसेंबर २०१७ :** या दिवशी मराठी ग्रंथ संग्रहालयाद्वारे आयोजित ९१ व्या अखिल भारतीय मराठी

साहित्य संमेलनाचे नियोजित अध्यक्ष मा. श्री. लक्ष्मीकांत देशमुख यांच्या सत्कारात शाखा सहभागी झाली होती. या कार्यक्रमाचे प्रास्ताविक व देशमुखांचा परिचय कार्यवाह डॉ. अनंत देशमुख यांनी करून दिला.

'बोलीभाषा मराठीचे वैभव आहे. बोलीभाषेतील शब्द जर प्रमाण भाषेत घेतले तर मराठी भाषा अधिक श्रीमंत होईल. मी यासाठी प्रयत्न करणार आहे,' असे ते म्हणाले.

**४. दि. ८ जानेवारी २०१८ :** राज्य मराठी विकास संस्था आयोजित व वसंतराव आचरेकर प्रतिष्ठान निर्मित विंदा करंदीकरांच्या समग्र साहित्य निर्मितीचे दर्शन घडविणारा 'स्वच्छंद' हा कार्यक्रम आयोजित केला होता. कार्यक्रमाची सुरुवात 'तन मन धन अर्पाया देई चेतना' या कवितेने केली. 'स्फूर्तिदाता विघ्नहर्ता' ही कविता माधव गावकर यांनी पेटी तबल्याच्या साथीवर गाऊन सादर केली. विंदांच्या 'पाऊस', 'माझ्या मना बन दगड', 'तेच ते तेच ते', 'सारे तिचेच होते', 'कर कर करा, मर मर मरा' इ. कविता तसेच 'पेरूमध्ये कुठली कैरी', 'पंढरपूरच्या वेशीपाशी नाच ग नाच', 'सोलापूरहून येते काकू' या बालकवितांचे वाचनही या वेळी दमदारपणे सादर केले. बालकविता या आपणच लिहिल्या आहेत असे मुलांना वाटले पाहिजेत असे विंदा म्हणत. 'शेवटी त्याला इलाज नाही', 'मिसिसिपीमध्ये मिसळू दे गंगा', 'मानवांनो आत या रे' या कविता सर्व सादरकर्त्यांनी एकत्र गाऊन कार्यक्रमाची रंगत उत्तरोत्तर वाढवतच नेली. 'स्वच्छंद'चे प्रणेते होते वामन पंडित तर त्यांना उत्कृष्ट साथ दिली अनिल फरफाटे, प्रसाद घाणेकर, जाई फरफाटे आणि माधव गावकर यांनी. ठाणे नगर वाचन मंदिराच्या भरघोस सहकार्याने या कार्यक्रमाद्वारे कविवर्य विंदांच्या स्मृती जागविल्या गेल्या.

**५. दि. ५ मार्च २०१८ :** महाराष्ट्र साहित्य परिषद, केंद्रीय कार्यालय पुणेच्या कार्यकारिणीची सभा सकाळी ११ ते १ या वेळेत आयोजित केली होती आणि दुपारी २ ते ५ या वेळेत शाखा मेळावा आयोजित केला होता. या मेळाव्यास चाळीसगाव, जळगाव, पुणे, सोलापूर, डोंबिवली, कल्याण, ठाणे, धुळे, वारणानगर, पिंपरी-चिंचवड, अंमळनेर, सातारा, फलटण, विक्रमगड, पंढरपूर, लासलगाव इ. शाखांचे प्रतिनिधी उपस्थित होते. प्रा. मिलिंद जोशी, प्रकाश पायगुडे, प्र. कार्यवाह, सौ. सुनिताराजे पवार, कोषाध्यक्ष, श्री. विनोद कुलकर्णी व शाखा मेळावा समन्वयकांनी उपस्थितांच्या व्यथा, समस्यांचे समाधानकारकरीत्या निराकरण केले. खेळीमेळीच्या वातावरणात शाखा मेळावा पार पडला.

## महाराष्ट्र साहित्य परिषद, कल्याण शाखा

१. महाराष्ट्र साहित्य परिषद व ठाणे जिल्हा वृत्तपत्र लेखक संघ यांचा संयुक्त विद्यमानाने आयोजित केलेल्या काव्य स्पर्धेचा व दिवाळी अंक स्पर्धेचा पारितोषिक वितरण समारंभ कॅ. र. माधव ओक हायस्कूल कल्याणच्या सभागृहात संपन्न झाला, तर ज्येष्ठ गझलकार श्री. माधव डोळे यांनी कवींना मार्गदर्शन केले.

कार्यक्रमाचे अध्यक्षस्थानी म.सा.प. चे कार्याध्यक्ष भिकू बारस्कर हे होते. या वेळी झालेल्या काव्य स्पर्धेचे परीक्षण सौ. स्वाती नातू व श्री. निंबाळकर यांनी केले. प्रसंगी सार्वजनिक वाचनालयाचे अध्यक्ष राजीव जोशी, पत्रकार जयतु मुथळकर, माजी आ. प्रभाकर संत, म.सा.प. कार्यवाह सौ. आशा जोशी, उपाध्यक्ष किरण जोगळेकर, सौ. अर्पिता देशपांडे व इतर मान्यवर उपस्थित होते.

२. विंदा करंदीकर जन्मशताब्दी निमित्त ओंजळीतील शब्दफुले : म.सा.प. कल्याण शाखेच्या वतीने कविवर्य विंदा करंदीकर यांचे जन्मशताब्दी निमित्ताने शब्द मंच प्रस्तुत 'कविता विंदांची' हा कार्यक्रम दिनांक ६ फेब्रुवारी २०१८ रोजी नानासाहेब धर्माधिकारी ज्येष्ठ नागरिक संघ सभागृह रामबाग लेन नं.६ कल्याण (प.) येथे आयोजित करण्यात आला होता. त्याप्रसंगी प्रमुख पाहुण्या म्हणून स्थानिक नगरसेविका सौ. वीणा जाधव, ज्येष्ठ नागरिक संघाचे अध्यक्ष श्री. गवाणकर उपस्थित होते. 'कविता विंदांच्या' या कार्यक्रमाअंतर्गत श्री. विजय जोशी, चैत्राली जोगळेकर, सोनाली चाफेकर यांनी विंदांच्या कविता सादर करून रसिकांना मंत्रमुग्ध केले. तसेच 'वार्तासूत्र'च्या कार्यकारी संपादिका सौ. अर्पिता देशपांडे, अरविंद शिंपी व इतर मान्यवर उपस्थित होते.

## महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे; शाखा जयसिंगपूर-शिरोळ

**दि. १ जुलै २०१७ : कविसंमेलन :** कार्याध्यक्ष प्रा. मोहन पाटील यांचे अध्यक्षतेखाली निमंत्रित कवींचे कवितावाचन हा कार्यक्रम संपन्न झाला. त्यामध्ये सौ. नीलम माणगावे, श्री. बाळ बाबर, श्री. अनिलकुमार पाटील, सौ. विजया बन्ने इ. कवी सहभागी झाले.

**दि. १ ऑगस्ट २०१७ :** सहादत अली मन्टो या कथालेखकाच्या दोन कथांचे (बूं, टिटवालका कुत्ता) वाचन केले व त्यावर उपस्थित सदस्यांमध्ये चर्चा घडवून आणली. चर्चेला चांगला प्रतिसाद मिळाला.

**दि. १ ऑक्टोबर २०१७ :** 'मराठी दिवाळी अंक : एक चर्चा' या विषयावर परिषदेच्या सदस्यांमध्ये चर्चा झाली. २०१७ या वर्षात दिवाळी अंकांची संख्या कमी होण्याची कारणे, दिवाळी अंकांची परंपरा, सांस्कृतिक ठेवा आणि जाहिराती, जी.एस.टी. व इतर प्रसारमाध्यमे यांमुळे दिवाळी अंकांचे वैभव कमी झाल्याचे मत अनेक सभासदांनी व्यक्त केले.



अनुक्रमणिका

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा जुळे सोलापूर

**दि. १५ नोव्हेंबर २०१७ :** म.सा.प., शाखा जुळे सोलापूरच्या आणि इंडियन मॉडेल स्कूल परिवाराच्या संयुक्त विद्यमाने, इंडियन मॉडेल स्कूल जुळे सोलापूरच्या मैदानावर 'हंपी' या मराठी चित्रपटाचे कलावंत उपस्थित होते. कार्याध्यक्षा सौ. सायली जोशी निर्मात्या असलेल्या या चित्रपटाचे दिग्दर्शक श्री. प्रकाश कुंटे, मराठी सिनेतारका प्राजक्ता माळी, तसेच मराठी सिनेतारका सोनाली कुलकर्णी, या निमित्त आले असताना महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा जुळे सोलापूरचे प्रमुख कार्यवाह गिरीश दुनाखे यांच्या हस्ते प्राजक्ता माळी आणि सोनाली कुलकर्णी यांचा श्री विठ्ठलमूर्ती व पुष्पगुच्छ देऊन तर दिग्दर्शक श्री. प्रकाश कुंटे यांचा कार्यकारिणी सदस्य श्री. रामचंद्र धर्मसाळे यांच्या हस्ते सत्कार करण्यात आला. त्यानंतर आर. जे. विग वंड्याने तिघांची जाहीर मुलाखत घेतली. सत्कारावद्दल प्राजक्ता माळी, सोनाली कुलकर्णी, दिग्दर्शक प्रकाश कुंटे यांनी आभार मानले.

**दि. १७ जानेवारी २०१८ :** म. सा. प. शाखा जुळे सोलापूरतर्फे बडोदा येथे होणाऱ्या नियोजित अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे नवनिर्वाचित अध्यक्ष मा. श्री. लक्ष्मीकांत देशमुख यांचा अध्यक्ष पद्माकर कुलकर्णी यांच्या हस्ते यथोचित सत्कार करण्यात आला. त्यांनी म.सा.प. जुळे सोलापूर शाखेच्या विविध उपक्रमांचे कौतुक करून शुभेच्छा दिल्या.

**दि. २६ फेब्रुवारी २०१८ :** म.सा.प. शाखा जुळे सोलापूर आणि ज्येष्ठ नागरिक संघ, वंथनाळ मठ, जुळे सोलापूर यांच्या संयुक्त विद्यमाने, जागतिक मराठी दिन आणि कविवर्य कुसुमाग्रज जन्मदिनाचे औचित्य साधून काव्यमैफल आयोजित केली होती. याचे उद्घाटन प्रा. ए.डी. जोशी यांनी केले. कवी माधव पवार यांच्या अध्यक्षतेखाली व सूत्रसंचालनामध्ये कवी मारुती कटकधोंड, कवी गिरीश दुनाखे, कालिदास चवडेकर, ज्येष्ठ कवी नारायण कुलकर्णी, शांताबाई क्षीरसागर, रामचंद्र धर्मसाळे, प्राजक्ता करवंदे यांनी आपापल्या उत्तमोत्तम कविता सादर करून श्रोत्यांना मंत्रमुग्ध केले. या कार्यक्रमापूर्वी सोलापुरातील ज्येष्ठ कवी डॉ. लक्ष्मीनारायण बोल्ली यांचे २४ फेब्रुवारी २०१८ रोजी निधन झाल्याने त्यांना भावपूर्ण श्रद्धांजली वाहण्यात आली.

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा सोपाननगर (सासवड , जि. पुणे)

१. महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या सोपान नगर (सासवड, जि. पुणे) शाखेने आयोजित केलेल्या निबंध स्पर्धेचा पारितोषिक वितरण समारंभ सोहळा मातोश्री जिजाई सोपानराव जाधव माध्यमिक विद्यालय, साकुर्डे, ता. पुरंदर येथे संपन्न झाला. म.सा.प.ने आयोजित केलेल्या निबंध स्पर्धेत माध्यमिक शाळेतील एकूण शंभर विद्यार्थ्यांनी सहभाग घेतला होता. निबंधांचे परीक्षण प्रा. पांडुरंग शिरवळकर (सेवा नि. मुख्याध्यापक), मा. सिद्राम भुजबळ (सेवा नि. कृषी अधिकारी), सुरेश कोडीतकर (अध्यक्ष, मसाप शाखा सोपाननगर), मा. मोहन साळवी (कोषाध्यक्ष, मसाप, शाखा सोपाननगर) आणि मार्गदर्शन अ‍ॅड. कैलास वेल्हेकर यांनी केले.

अपेक्षा शामराव सस्ते, प्रथम क्रमांक, प्रफुल्लचंद्र बनसोडे, द्वितीय क्रमांक, तृप्ती रणजित जगताप-तृतीय क्रमांक, समृद्धी अजित सस्ते- उत्तेजनार्थ, अक्षदा सुभाष सस्ते- उत्तेजनार्थ, शुभम जालिंदर गायकवाड- उत्तेजनार्थ बक्षिसे देण्यात आली. सर्व विजयी विद्यार्थ्यांना स्मृतिचिन्ह देऊन गौरविण्यात आले.

या कार्यक्रमासाठी विद्यालयाचे मुख्याध्यापक माननीय कामथे सर, मा. तानाजी झेंडे, मा. शिंदे सर, व इतर सर्व शिक्षक, सहकारी यांनी विशेष सहकार्य केले.

या कार्यक्रमास संस्थेचे विद्यमान संचालक माननीय शहाजी सस्ते उपस्थित होते.

२. सासवड (ता. पुरंदर) येथे महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या सोपाननगर शाखेच्या वतीने लेखक सुरेश कोडीतकर यांच्या 'ज्ञानेश्वरी : एक समाजप्रबोधन' व 'चाणक्यनीती' या पुस्तकांचे व भारती कोडीतकर यांच्या 'आकांक्षा' या कादंबरीचे प्रकाशन डॉ. देखणे यांच्या हस्ते पुरंदर मेडिकल असोसिएशनच्या सभागृहात झाले. या वेळी कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी मेडिकल असोसिएशनचे अध्यक्ष डॉ. राजेश दळवी होते.

कोडीतकर दांपत्याने ग्रामीण भागात वैद्यकीय क्षेत्रात काम करत १७ पुस्तकांची निर्मिती केली.

या वेळी रावसाहेब पवार, सुरेश कोडीतकर, डॉ. दळवी यांनी मनोगत मांडले. सूत्रसंचालन प्रा. नानासाहेब पवार यांनी केले. आभार साळवी यांनी मानले.

---

**हार्दिक अभिनंदन!**

बेळगाव जिल्ह्यातील कुद्रेमनी येथे **बलभीम साहित्य संघाच्या** वतीने आयोजित **१२वे साहित्य संमेलन** म.सा.प.चे कार्याध्यक्ष **प्रा. मिलिंद जोशी** अध्यक्षतेखाली झाले. अत्यंत प्रतिकूल परिस्थितीत सीमावासीय मराठी भाषा, साहित्य आणि संस्कृती जपत आहे. हे संमेलन त्यांचे भावनिक बळ वाढवते. भव्य ग्रंथदिंडी, संपूर्ण गावाचा संमेलनातला सहभाग, प्रचंड उत्साह, नेटके आयोजन यांमुळे हे संमेलन नेहमीच वैशिष्ट्यपूर्ण ठरले आहे. या मंडळींच्या मराठी भाषा आणि साहित्य प्रेमाला सलाम! आणि प्रा. मिलिंद जोशी यांचे हार्दिक अभिनंदन!



अनुक्रमणिका

# महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे कार्यवृत्त नोंद

## (१ जानेवारी २०१८ ते ३१ मार्च २०१८)

**दि. ११ डिसेंबर २०१७ :** साहित्य संमेलनाचे नवनिर्वाचित अध्यक्ष श्री. लक्ष्मीकांत देशमुख यांचा परंपरेप्रमाणे पहिला सत्कार मसापतर्फे माजी संमेलनाध्यक्ष डॉ. श्रीपाल सबनीस यांच्या हस्ते करण्यात आला. या प्रसंगी अनेक साहित्यिक, सांस्कृतिक, सामाजिक क्षेत्रातील संस्थांनी श्री. देशमुख यांचा सत्कार केला.

**दि. १४ डिसेंबर २०१७ : लेखक तुमच्या भेटीला :** या उपक्रमांतर्गत अरण्येश्वर माध्यमिक विद्यालय, पुणे या शाळेच्या विद्यार्थ्यांशी ज्येष्ठ पत्रकार व लेखक श्री. अरुण खोरे यांनी संवाद साधला.

**दि. १८ ते २० डिसेंबर २०१७ : मासिक मनोरंजनकार का. र. मित्र व्याख्यानमाला :** परराज्यातील साहित्य आणि साहित्यिक या संकल्पनेवर आधारित लागोपाठ तीन दिवसांची व्याख्यानमाला आयोजित करण्यात आली होती. दि. १८ डिसेंबरला डॉ. दामोदर खडसे यांचे 'प्रेमचंदांच्या कथा' या विषयावर तर दि. १९ डिसेंबरला प्रा. डॉ. माधवी भट यांचे 'रवींद्रनाथांचे कथाविश्व' या विषयावर व दि. २० डिसेंबरला डॉ. उमा कुलकर्णी यांची 'भैरप्पांचे कादंबरीविश्व' या विषयावर व्याख्याने आयोजित करण्यात आली होती. रसिकांचा उत्तम प्रतिसाद तीनही व्याख्यानांना मिळाला. श्रोत्यांनी तीनही वक्त्यांशी व्याख्यानांच्या शेवटी प्रश्न विचारून संवाद साधला.

**दि. २१ डिसेंबर २०१७ : एक कवी, एक कवयित्री :** हेमंत जोगळेकर आणि डॉ. वृषाली किन्हाळकर या कवींशी उद्धव कानडे आणि प्रमोद आडकर यांनी संवाद साधला. कार्यक्रमाला श्रोत्यांचा उत्स्फूर्त प्रतिसाद मिळाला.

**दि. २३ डिसेंबर २०१७ : अ. भा. म. साहित्य संमेलनाच्या स्वागताध्यक्षांचा सत्कार सोहळा :** ९१वे अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन यंदा बडोदा येथे संपन्न होत आहे. त्याच्या स्वागताध्यक्षा राजमाता शुभांगिनीराजे गायकवाड यांचा त्यानिमित्ताने परिषदेतर्फे सत्कार करण्यात आला. ८९व्या साहित्य संमेलनाचे स्वागताध्यक्ष मा. डॉ. पी. डी. पाटील यांच्या हस्ते व डॉ. शिवाजीराव कदम, मा. उल्हासदादा पवार, कार्याध्यक्ष दिलीप खोपकर, कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी, प्र. कार्यवाह प्रकाश पायगुडे यांच्या उपस्थितीत हा सत्कार सोहळा आयोजित करण्यात आला होता. प्रा. मिलिंद जोशी, दिलीप खोपकर, डॉ. कदम, डॉ. पी. डी. पाटील, उल्हासदादा पवार यांची यथोचित भाषणे झाली. राजमाता शुभांगिनीराजे गायकवाड यांनी सत्काराला उत्तर दिले व मराठी साहित्य रसिकांना बडोद्याच्या साहित्य संमेलनाला उपस्थित राहण्याची आवाहन केले. या सोहळ्यास विजयराव कोलते, डॉ. सतीश देसाई, भारत देसडला, भारत सासणे, अरुण शेवते, सुनील महाजन, डॉ. राजा दीक्षित, शिरीष चिटणीस, वनिता ठाकूर, डॉ. न. म. जोशी, सचिन ईटकर, डॉ. अरविंद संगमनेरकर व सर्व पदाधिकारी उपस्थित होते.

**दि. २६ डिसेंबर २०१७ : कै. श्री. म. माटे स्मृती व्याख्यान :** प्रा. तेज निवळीकर यांचे 'उपेक्षित समाज : गाडगेमहाराजांचे विचार' या विषयावर व्याख्यान झाले.

**दि. ६ जानेवारी २०१८ : पर्यावरणस्नेही साहित्य संमेलन :** किर्लोस्कर वसुंधरा महोत्सवाचा एक भाग म्हणून गेली काही वर्षे एक दिवसाचे पर्यावरणस्नेही साहित्य संमेलन महाराष्ट्र साहित्य परिषद व सर परशुराम भाऊ महाविद्यालय या तिघांच्या संयुक्त सहकार्याने सप कॉलेजात घेतले जाते. यंदाच्या साहित्य संमेलनाचे अध्यक्ष वन्यजीव अभ्यासक व साहित्यिक मारुती चित्तमपल्ली यांनी भूषविले. अच्युत गोडबोले यांच्या हस्ते उद्घाटन झाले. 'चंगळवादी वृत्ती आणि पर्यावरण' या विषयावर त्यांचे व्याख्यान झाले. प्रारंभी कॉलेज परिसरातील उपवनात मान्यवरांच्या हस्ते वृक्षारोपण झाले. उद्घाटन व दीपप्रज्वलनानंतर संत जनाबाईचा अभंग सादर करून संमेलनाची उत्साहात सुरुवात झाली. प्रा. उंब्रजकर यांनी व प्रा. मिलिंद जोशी व वीरेंद्र चित्राव यांनी प्रास्ताविक केले. श्री. गोडबोले यांच्या व्याख्यानानंतर विद्यार्थ्यांच्या पारितोषिकप्राप्त साहित्याचे सादरीकरण झाले. पर्यावरणाच्या दृष्टीने स. प. महाविद्यालयाचा परिसर कसा दिसतो हे दाखविणारी एक चित्रफित दाखविण्यात आली. दुपारच्या सत्रात अंकुश आरेकर व लता ऐवाळे यांच्या 'रानातल्या कवितां'चे वाचन झाले. त्यानंतर संगीतकार डॉ. सलील कुलकर्णी यांचा 'हिरवाई' हा गीते सादरीकरणाचा कार्यक्रम झाला. सुप्रिया चित्राव यांचा सहभाग होता. श्री. जयंत कर्णिक यांनी मारुती चित्तमपल्ली यांची दीर्घ मुलाखत घेतली. समारोपात पर्यावरणविषयक काही ठराव विद्यार्थ्यांच्या आवाजी मतदानाने पास झाले. दिवसभराच्या संपूर्ण संमेलनाला विद्यार्थ्यांच्या भरपूर उपस्थितीचा व अन्य नागरिकांचा उत्तम प्रतिसाद लाभला.

**दि. ९ जानेवारी २०१८ : नाट्य अभिवाचन :** महाराष्ट्र साहित्य परिषद व 'नाट्यगंध' पुणे यांच्या संयुक्त विद्यमाने प्रा. अजित दळवी लिखित 'डॉक्टर तुम्हीसुद्धा!' या नाटकाच्या नाट्यांशाचे नाट्य अभिवाचन झाले. डॉ. मधुरा कोरात्रे = डॉ. वैदेही, सिद्धार्थ जोशी = डॉ. शिरीष, ओंकार जाधव = डॉ. अविनाश आणि चित्रा देशपांडे = रत्ना पवार या भूमिका

आपल्या नाट्यवाचनातून जिवंत केल्या.

**दि. ११ जानेवारी २०१८ : प. पू. परमहंस स्वामी स्वरूपानंद स्मृती व्याख्यान :** स्वामी स्वरूपानंद सेवा मंडळ व महाराष्ट्र साहित्य परिषद यांच्या संयुक्त विद्यमाने डॉ. अशोक कामत यांचे 'स्वामी स्वरूपानंद व आधुनिक संतपरंपरा' या विषयावर व्याख्यान झाले. व्यासपीठावर कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी, पंढरपूरच्या श्री विठ्ठल देवस्थान कमिटीचे माजी अध्यक्ष शशिकांत पागे, वसंतराव देसाई हे मान्यवर उपस्थित होते. स्वामींनी लिहिलेले पसायदान सौ. देसाई यांनी सादर केले.

**दि. १७ जानेवारी २०१८ : कथासुगंध :** लेखक डॉ. राजेंद्र माने यांच्या कथेचे अभिवाचन हा कार्यक्रम झाला. महाराष्ट्र कल्चरल सेंटरच्या अभिवाचकांनी या कथांचे वाचन केले. डॉ. राजेंद्र माने यांनी कथेमागची कथा विशद करून सांगितली.

**दि. १९ जानेवारी २०१८ : प्रकाशक-लेखक संवाद :** अ. भा. मराठी प्रकाशक संघ, अ. भा. मराठी साहित्य महामंडळ व महाराष्ट्र साहित्य परिषद यांच्या संयुक्त विद्यमाने दिवसभराचा प्रकाशक-लेखक संवाद मेळावा घेण्यात आला. मा. विनोद तावडे शालेय शिक्षण मंत्री, महाराष्ट्र राज्य यांच्या हस्ते दीपप्रज्वलनाने उद्घाटन व त्यांचे भाषण 'साहित्य व्यवहार व शासनाची भूमिका' या विषयावर झाले. यानंतर प्रा. मिलिंद जोशी यांचे 'मराठी साहित्याचे मार्केटिंग, प्रकाशक आणि लेखक' या विषयावर व्याख्यान झाले. नंतर श्री. व्ही. पी. शिंत्रे यांचे 'कॉपी राईट कायदा : लेखक व प्रकाशकांच्या दृष्टीने फायद्याचा' या विषयावर मार्गदर्शनपर भाषण झाले. श्री. दत्तात्रेय जायदे यांचे 'जीएसटी आणि लेखक प्रकाशक' या विषयावर भाषण झाले. दुसऱ्या सत्रात 'संपादन व प्रूफ करेक्शन' या विषयावर चर्चा झाली. चर्चेत अविनाश पंडीत, शशिकला उपाध्ये, मनोहर सोनावणे, आनंद हर्डीकर यांनी आपले विचार मांडले. नंतर 'मी व्यवसाय कसा वाढवला' या विषयावर अनिल मेहता, अरविंद पाटकर, दत्तात्रय पाष्टे यांच्या मुलाखती प्रकाशक संघाचे अध्यक्ष व प्रकाशक राजीव बर्वे यांनी घेतल्या. दिवसभराच्या कार्यक्रमाला प्रवेश फी होती, पण संपूर्ण महाराष्ट्रातून बहुसंख्येने प्रकाशक व लेखकांनी हजेरी लावली होती. शेवटी 'बदलत्या काळात छापील पुस्तकांवर आक्रमण की नवीन संधी?' या विषयावर मंदार जोगळेकर, सुप्रिया लिमये, संजय भास्कर जोशी यांनी विचार मांडले. सकाळच्या सत्रात शरद गोगटे, अनिल मेहता, शंकर सारडा, भारत सासणे, डॉ. निशिकांत श्रोत्री, शारंगपाणी, डॉ. अश्विनी धोंगडे, आश्लेषा महाजन, वसंत आंबाडे, डॉ. संगीता बर्वे, डॉ. मधुरा कोरान्ने या प्रकाशक, साहित्यिकांचा सत्कार लक्ष्मीकांत देशमुख आणि प्रा. मिलिंद जोशी यांच्या हस्ते सत्कार करण्यात आले.

**दि. १९ जानेवारी २०१८ : कॉन्टिनेंटल पुरस्कृत कै. चिं. वि. जोशी पुरस्कार वितरण सोहळा :** 'दिवस असे की' या दीपा मंडलीक यांच्या पुस्तकास कै. चिं. वि. जोशी पुरस्कार श्रीनिवास भणगे यांच्या हस्ते प्रदान करण्यात आला. सुवर्णा दिवेकर व शकुंतला फडणीस यांची निवड समिती होती. पैकी शकुंतला फडणीस यांनी पुरस्कार निवडीमागची भूमिका विशद केली. याच वेळी सायन पब्लिकेशन्सच्या नितीन कोत्तापल्ले यांनाही प्रकाशक पुरस्कार देण्यात आला. प्रसिद्ध व्यंगचित्रकार शि. द. फडणीस यांची विशेष उपस्थिती या सोहळ्यास लाभली होती.

**दि. १ फेब्रुवारी २०१८ : राज्यस्तरीय दिवाळी अंक स्पर्धा (२०१७) पारितोषिक वितरण समारंभ :** या समारंभास रवी परांजपे आणि चंद्रकांत शेवाळे प्रमुख पाहुणे म्हणून उपस्थित होते. रवी परांजपे, चंद्रकांत शेवाळे, मीनाक्षी केळकर, महेंद्र मुंजाळ, डॉ. अविनाश सांगोलेकर, प्रभा सोनावणे यांचा सत्कार करण्यात आला. नंतर पारितोषिक वितरण प्रमुख पाहुण्यांच्या हस्ते झाले. परीक्षकांचे मनोगत डॉ. अविनाश सांगोलेकर यांनी मांडले. मोनिका गजेंद्रगडकर, अशोक कोठावळे, मनस्विनी प्रभुणे, जयराम देसाई, डॉ. वर्षा तोडमल, राम जगताप, विजय खाडिलकर, डॉ. रणधीर शिंदे या सर्व पारितोषिक विजेत्यांनी मनोगते व्यक्त केली. रवी परांजपे, चंद्रकांत शेवाळे व प्रा. मिलिंद जोशी यांची उचित भाषणे झाली. (प्रस्तुत दिवाळी अंक स्पर्धेचा अंतिम निकाल सोबत जोडला आहे.)

**दि. ५ फेब्रुवारी २०१८ : लेखक तुमच्या भेटीला :** या उपक्रमांतर्गत मोरे विद्यालयातील विद्यार्थ्यांशी बाल साहित्यकार डॉ. संगीता बर्वे यांनी संवाद साधला.

**दि. ५ फेब्रुवारी २०१८ : रामगणेशाय नमः :** कै. राम गणेश गडकरी यांच्या जन्मशताब्दी वर्षाच्या प्रारंभाला महाराष्ट्र साहित्य परिषद आणि 'मुखवटे' या संस्थेतर्फे राम गणेश गडकरी यांच्या साहित्यावर आधारित 'राम गणेशाय नमः' हा कार्यक्रम विजय गोविंद आणि श्रीराम रानडे यांनी सादर केला.

**दि. ६ फेब्रुवारी २०१८ : कै. माधवराव मदाने स्मृतिव्याख्यान :** 'युद्धस्य कथा रम्यः' या विषयावर लेफ्टनंट कमोडर (निवृत्त) विनायक अभ्यंकर यांचे व्याख्यान झाले. सुधीर कुबेर यांनी 'एका जवानाला भावांजली' ही कविता प्रारंभी सादर केली.

**दि. ८ फेब्रुवारी २०१८ : एक कवी एक कवयित्री :** या उपक्रमांतर्गत भूषण कटककर व सुप्रिया जाधव यांच्याशी उद्धव कानडे व प्रमोद आडकर यांनी संवाद साधला. कार्यक्रमात या दोघांनी आपल्या गझलरचना सादर केल्या.

**दि. १२ फेब्रुवारी २०१८ : मसाप गप्पा :** माजी केंद्रीय गृह व न्याय सचिव डॉ. माधव गोडबोले यांच्याशी सुधीर गाडगीळ यांनी संवाद साधला. सुजाता गोडबोले, डॉ. उत्तमराव भोईटे, दिलीप माजगावकर इ. मान्यवर उपस्थित होते.

**दि. १९ फेब्रुवारी २०१८ : कमोडोर कै. म.के. लेले स्मृतीव्याख्यान :** हे वर्ष बालकवींच्या स्मृतिशताब्दीचे वर्ष आहे. या निमित्ताने डॉ. प्रतिमा जगताप यांचे 'बालकवींची निसर्गकविता' या विषयावर व्याख्यान झाले. माजी विश्वस्त डॉ. व्ही. व्ही. घाणेकर यांनी मनोगत व्यक्त केले व दीपक करंदीकर यांनी प्रारंभी बालकवींच्या 'औदुंबर' कवितेचे वाचन केले.

**दि. २० फेब्रुवारी २०१८ : कै. सुहासिनी इर्लेकर स्मृती पुरस्कार :** नवोदित कवीच्या पहिल्या कविता संग्रहाला दिला जाणारा हा पुरस्कार यंदा माधव हुंडेकर यांच्या 'दायभाग' या कवितासंग्रहाला डॉ. अश्विनी धोंगडे यांच्या हस्ते देण्यात आले. मीरा शिंदे व प्रा. वर्षा तोडमल यांनी परीक्षक म्हणून काम पाहिले. यावेळी माधव हुंडेकर, डॉ. अश्विनी धोंगडे व समारंभाचे अध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यांनी उचित भाषणे केली. प्रा. वर्षा तोडमल यांनी परीक्षकांचे मनोगत मांडले.

**दि. २६ फेब्रुवारी २०१८ : स्वा. सावरकर स्मृतिदिन :** महाराष्ट्र साहित्य परिषद व 'झलक', पुणे आयोजित स्वा. सावरकर रचित गीतांवर आधारितं 'सागरा प्राण तळमळला' हा सांगीतिक कार्यक्रम सादर झाला. अविनाश वैजापूरकर, श्रीपाद भावे, पद्मजा बंकापुरे, प्रतिभा देशपांडे, प्राजक्ता मांडके, प्रसन्न बाम, चंद्रकांत रोंघे, समीर बंकापुरे या कलाकारांनी सावरकरगीते सादर केली. सावरकरप्रेमी रसिकांच्या उपस्थितीचा प्रचंड प्रतिसाद या कार्यक्रमास लाभला.

**दि. २७ फेब्रुवारी २०१८ : मराठी राजभाषा दिन व कुसुमाग्रज जयंती :** वि. वा. शिरवाडकर लिखित 'वीज म्हणाली धरतीला' या नाटकाच्या नाट्यांशाचे अभिवाचन करण्यात आले. अंजली लाळे, संज्ञा कुलकर्णी, वैशाली कणसकर, मधुरा शहाणे, जया जुन्नरकर हे अभिवाचक होते.

**दि. २८ फेब्रुवारी २०१८ : जागतिक विज्ञान दिन :** महाराष्ट्र साहित्य परिषद व मराठी विज्ञान परिषद (पुणे विभाग) यांच्या संयुक्त विद्यमाने 'साहित्य आणि आधुनिक विज्ञान' या विषयावर डॉ. एन. जे. पवार यांचे व्याख्यान झाले. यावेळेस 'सृष्टिज्ञान' मासिकाचा विज्ञान पर्यटन विशेषांक डॉ. पवार व प्रा. मिलिंद जोशी यांना डॉ. क. कृ. क्षीरसागर यांच्या हस्ते भेट देण्यात आला. विज्ञान परिषदेचे अध्यक्ष विनय र. र. व प्रा. जोशी यांनी प्रास्ताविक केले. राजेंद्र सराफ यांनी वक्त्यांचा परिचय करून दिला.

**- प्रकाश पायगुडे,**
प्रमुख कार्यवाह
(शहर कार्यवृत्त नोंद : **दीपक करंदीकर,**
कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे)

**महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे**
**दिवाळी अंक स्पर्धा २०१७ चा निकाल**

| | |
|---|---|
| १. अ.स. गोखले स्मृत्यर्थ 'रत्नाकर पारितोषिक' | अंक : मौज, संपादक : मोनिका गजेंद्रगडकर |
| २. चंद्रकांत शेवाळे पुरस्कृत ३ पारितोषिके : | |
| अ) 'विविध ज्ञानविस्तार'कर्ते रावसाहेब मोरमकर पारितोषिक | अंक : 'ललित', संपादक : अशोक कोठावळे |
| ब) मासिक 'मनोरंजन'कार का. र. मित्र पारितोषिक | अंक : 'समदा', संपादक : मनस्विनी प्रभुणे |
| क) शं. वा. किर्लोस्कर पारितोषिक | अंक : 'साहित्य शिवार', संपादक : जयराम देसाई |
| ३) जानकीबाई केळकर स्मृत्यर्थ उत्कृष्ट बाल-कुमार | अंक : 'मन:शक्ती', दिवाळी अंक पारितोषिक<br>संपादक : डॉ. वर्षा तोडमल |
| ४) दि. अ. सोनटक्के पारितोषिक (उत्कृष्ट कथेसाठी) | कथा : 'आवर्त', लेखक : विजय खाडीलकर, अंक : अक्षर |
| ५) अनंत काणेकर पारितोषिक (उत्कृष्ट ललितलेखासाठी) | लेख : 'येडापिसा वारा चिकटला जन्मभर तुझ्या देहाला'<br>लेखक : डॉ. रणधीर शिंदे, अंक : शब्द शिवार |
| ६) डेलीहंट पुरस्कृत ऑनलाईन दिवाळी अंक पारितोषिक | अंक : 'अक्षरनामा', संपादक : राम जगताप |

**निमंत्रक : वि. दा. पिंगळे कार्यवाह, ग्रंथालय विभाग**

# क्षणचित्रे




महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या चाळीसगाव शाखेच्या नूतन कार्यालयाच्या उद्‌घाटनप्रसंगी कार्यवाह बी. एल. ठाकरे, उपाध्यक्षा ॲड. सुषमाताई पाटील, कार्याध्यक्ष विजय पाटील, संस्थापक अध्यक्ष प्राचार्य तानसेन जगताप, प्रमुख कार्यवाह गणेश आढाव, कोषाध्यक्ष ग्रंथमित्र आण्णा धुमाळ व कार्यवाह प्रा. पी. एस. चव्हाण



बडोदा येथे झालेल्या ९१व्या अ. भा. मराठी साहित्य संमेलनाच्या स्वागताध्यक्ष राजमाता शुभांगिनीराजे गायकवाड यांचा सत्कार करताना डॉ. पी. डी. पाटील, सोबत डॉ. शिवाजीराव कदम, उल्हासदादा पवार, आणि पदाधिकारी



महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या इस्लामपूर शाखेच्या वतीने आयोजित युवा साहित्य-नाट्य संमेलनाच्या उद्‌घाटनप्रसंगी संमेलनाध्यक्ष डॉ. आशुतोष जावडेकर आणि पदाधिकारी.

## महाराष्ट्र साहित्य परिषदेची 'बालकुमार साहित्य संमेलने'



(सातारा)
आयोजक : मसाप, शाहूपुरी शाखा (जि.सातारा)
संमेलनाध्यक्ष : राजीव तांबे




(भोसे, पंढरपूर)
आयोजक : मसाप, पंढरपूर शाखा
संमेलनाध्यक्ष : डॉ. द. ता. भोसले



(चाकण)
आयोजक : मसाप, पिंपरी-चिंचवड शाखा
संमेलनाध्यक्ष : इंदुमती जोंधळे

बुक पोस्ट

भारत INDIA POSTAGE ₹2.00

ना. हांडगे नवनाथ नारायण
४८३. मु.पो. विंचूर, ता. निफाड
(जि. नाशिक)


प्रेषक
प्रमुख कार्यवाह,
**महाराष्ट्र साहित्य परिषद,**
टिळक रस्ता, पुणे - ४११ ०३०.
दूरभाष : ०२०-२४४७५९६३



Maharashtra Sahitya Patrika. Quarterly : March 2018
Registered with the Register of Newspaper for India under No. 6398/57
Book Pkt. Periodical Category